# विचारसौंदर्य

लेखक

प्रो. वामन मल्हार जोशी, एम्. ए.

किंमत एक रुपया.

स्वस्तिक पब्लिशिंग हाउस, मुंबई ४

# अनुक्रमणिका

# अलीकडे महाकाव्यें कां निर्माण होत नाहींत ?

कित्येकांना असें वाटतें कीं ज्ञान फार वाढल्यामुळें ( — ‘अक्कल’ फार वाढल्यामुळें म्हणा पाहिजे तर ! ) कवित्व अशक्यप्राय होत चाललें आहे, अर्थात् महाकाव्य मुतराम् अशक्यप्राय झालें आहे. मेकॉलेनें मिल्टनवरील आपल्या सुप्रसिद्ध निबंधांत संस्कृतीच्या प्रगतीबरोबर कवित्वाची परागति होते असें प्रमेय मांडलें व तें कांहीं लोकांना प्रथमदर्शनीं खरें दिसलें. पण बारकाईनें विचार केल्यावर आधिभौतिक काय, आध्यात्मिक काय, किंवा कोणत्याहि काय, ज्ञानाचा व कवित्वाचा ‘अहि-नकुलवत्’ किंवा ‘तमः प्रकाशवत्’ विरोध आहे हें खरें दिसत नाहीं. ज्ञानानें असें काय केलें आहे कीं, त्यामुळें कवित्वानें त्यापासून भिऊन चार पावलें दूर असावें ? ज्ञानाच्या उष्णतेनें कवित्व करपतें, ज्ञानाच्या प्रखर प्रकाशात कवित्वाचे डोळे दिपतात, इत्यादि प्रकारची अलंकारिक भाषा तर्कशुद्ध प्रमाणाची योग्यता पावूं शकत नाहीं. कवितादेवीला शब्दचित्रलेखनाकरितां व इतर वाग्विलासाकरितां वर्ण्य विषय म्हणून चंद्रिकायुक्त किंवा अंधकारमग्न रात्र प्रिय असते. मनुष्यजातीच्या किंवा व्यक्तीच्या अज्ञानान्धकारांतच तिला वाचा फुटते, किंवा तिची वाणी मधुरता धारण करते असें का म्हणावयाचें आहे ? अरुणोदय व उषःकाल काव्यात्मक वर्णनाला अनुकूल असतात, म्हणून मानवी संस्कृतीचा किंवा व्यक्तीच्या शैक्षणिक संस्कारांचा अरुणोदय किंवा उषःकाल कवित्वस्फूर्तीला अनुकूल असतो असें तर म्हणणें नाहीं ? त्यांतली खरी गोष्ट अशी आहे कीं, ज्ञानामध्यें किंवा अनुभवामध्यें प्रगति होऊन मनुष्याला किंवा मनुष्यजातीला प्रौढत्व आलें तर त्यामुळें कवितादेवी लाजते,

किंवा रुसते, किंवा रागावते, अथवा क्षीण होते, या म्हणण्याला इतिहासाचा किंवा तर्काचा कांहींच आधार नाहीं. टेनिसन, ब्राऊनिंग, गटे ( Goethe ), हे काय अज्ञानयुगांतले आहेत, का ते अज्ञानी होते ? रवीन्द्रनाथ टागोर हे चांगले ज्ञानी, विचारी, अनुभवी व तत्त्वचिकित्सक आहेत; मग कवित्वानें त्यांच्याशीं कशी गट्टी केली ? ज्ञानावर जर कविता-देवीचा राग असता व अज्ञान जर तिला प्रिय असतें तर ज्ञानविहीन बालक हा उत्तम कवि झाला असता व व्यास-वाल्मीकि इत्यादि पौरस्त्य कवि किंवा मिल्टन-शेक्स्पिअर इत्यादि पाश्चात्य कवि यांनीं वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध झाल्यावर जी कविता केली ती कविता त्याज्य ठरली असती; पण तज्ज्ञांना तशी ती वाटत नाहीं ! कांहीं ज्ञानी लोकांमध्यें कवित्व नसतें ही गोष्ट खरी आहे, पण कवित्वाभावाचें कारण त्यांचें 'ज्ञान' नव्हे, तर प्रतिभेचा अभाव हें होय. कांहीं असंस्कृत माणसांवर कवितादेवीचा वरदहस्त असतो हेंहि खरें, पण त्यांचें असंस्कृतत्व हें कांहीं कवितादेवीच्या कृपाप्रसादाचें कारण नव्हे, तर त्यांचें सहृदयत्व हें त्याचें खरें कारण होय. केवळ ज्ञान हें काव्य निर्माण करूं शकणार नाहीं; पण तें काव्यस्फूर्तीस विरोधहि करीत नाहीं; झालें तर उपकारक होतें. 'कवि' याचा अर्थ एके काळीं 'ज्ञानी' असा होता. ( **किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः** इत्यादि वचनांची येथें कांहीं जणांना आठवण होईल. ) विद्वान् असून कवि असलेल्यांचीं किती तरी उदाहरणें देतां येतील, व या उदाहरणांचा विचार केला असतां असें दिसून येईल कीं विद्वत्व हें जसें सौजन्याच्या आड येत नाहीं, त्याप्रमाणेंच विद्वत्व हें कवित्वाच्याहि आड येत नाहीं, कारण कवित्व हें निराळ्याच गोष्टींवर अवलंबून आहे.

बाल्यांतील मुग्धत्वाचें रम्यत्व कवींनीं '**रम्य तें बालपण देईं देवा**' अशा रीतीनें गावें पाहिजे तर; त्याचप्रमाणें '**पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्**' असें म्हणून वेदान्त्यांनीं बाल्याचें एका दृष्टीनें कौतुक करावें पाहिजे तर; पण व्यक्तीच्या किंवा जातीच्या बाल्यांतील अज्ञान व संस्कारहीनत्व हीं कवित्वाला पूर्वी पोषक झालीं किंवा हल्लीं होतात असें मानण्यास आधार नाहीं हें ध्यानांत धरावें.

ज्ञान हें कवित्वाला विरोधक नाहीं, तर उपकारक व उद्बोधक आहे असेंहि दाखवितां येईल, पण झाला आहे विस्तार तेवढयावरून वाचकांना बहुधा पटलें असेल कीं, महाकाव्याच्या निर्मितीला अलीकडील ज्ञानवृद्धीनें अडथळा केला आहे

हें म्हणणें अयुक्तिक व अनाधार आहे.

अलीकडे लेखकांना महाकाव्यें लिहिण्यास व तीं वाचकांना वाचण्यास वेळ किंवा फुरसत मिळत नाहीं म्हणून, व 'मागणी तसा पुरवठा' या न्यायानें लघुकाव्यें व लघुकथा यांचीच फार मागणी असल्यामुळें, महाकाव्याचा पुरवठा अलीकडे होत नाहीं, या युक्तिवादांतहि सयुक्तिकता नाहीं. वाचकांना महाकाव्यें वाचण्यास फुरसत नाहीं हें म्हणणें तर हास्यापदच आहे. मोठमोठ्या कादंबऱ्या व 'गीतारहस्या' सारखे मोठमोठे ग्रंथ जर अलीकडे बाहेर पडूं शकतात व खपतात तर महाकाव्यांनींच असें काय केलें आहे कीं, त्यांच्या बाबतींत मात्र हा न्याय लागू पडूं नये? तसेंच कवीला किंवा कोणत्याहि लेखकाला फुरसत नाहीं हें म्हणणेंदेखील बहुधा व बव्हंशीं खोटेंच असतें. ज्याच्याजवळ विचार आहेत, कल्पना आहेत, उत्साह आहे, तो वेळांत वेळ काढतो व रात्रीचा दिवस करून व आपल्या विषयाशीं तद्रूप होऊन कलात्मक निर्मिति करूं शकतो. अपवाद कांहीं असतील, पण सामान्य नियम हा असा आहे. निर्मिति झाली तरी वाचक मिळाले पाहिजेत ना, असा कोणीं येथें प्रश्न विचारला तर त्याला उत्तर असें कीं, कलाकृति जी निर्माण होते ती बाजारांतल्या खाद्य-पेयादि जिनसांच्याप्रमाणें 'मागणी व पुरवठा' या अर्थ-शास्त्रीय न्यायाप्रमाणें होत नाहीं. काव्यनिर्मितीचें काय किंवा इतर कलाकृतींचें काय, 'अर्थ-शास्त्र' निराळेंच आहे! कलाविलासाचा आनंद इतरांना मिळावा व त्यांनीं आपली वाहवाहि करावी, असे हेतु जरी थोड्याबहुत प्रमाणांत कलानिरत मनुष्याच्या मनांत वावरत असले तरी कलाकृति निर्माण करतांना रसलोलुपांची संख्या तो मोजीत बसत नाहीं किंवा त्यांच्या 'वाहवा' च्या टाळ्या मधून मधून ऐकूं आल्या नाहींत म्हणून अडून बसत नाहीं. महाकाव्याला अनुकूल असे रम्योदात्त, रम्यविशाल, रम्याद्भुत, रम्यभीषण इत्यादि प्रकारचे विषयच अलीकडील व्यावहारिक, शास्त्रीय, नीरस, गद्यात्मक जगांत मिळत नाहींत ही रडहि अशीच निरर्थक आहे. आधीं कोणताहि काळ गद्यात्मक असतो हें म्हणणेंच खोटें आहे. काळ गद्यात्मक नसतो, तर मन गद्यात्मक असतें. पाहणाऱ्याला काव्य सगळीकडे आहे; काव्यदृष्ट्या जो अंधळा असेल त्याला सगळें जगच अंधळें व अंधारानें भरलेलें दिसावयाचें. पूर्वी काव्याला विषय चांगले मिळत व हल्लीं मिळत नाहींत या म्हणण्यांत अर्थ काय? पूर्वी युद्धें किंवा महायुद्धें होत होतीं आणि अलीकडे होत

नाहींत असें नाहीं. पूर्वीच राष्ट्राराष्ट्रांमध्यें किंवा संस्कृती-संस्कृतीमध्यें लढे होते आणि अलीकडे ते लढे नष्ट झाले आहेत असेंहि नाहीं. चंद्रकला, तारका, उषा वगैरे पूर्वी जशा होत्या तशाच हल्लीं आहेत. बायका पूर्वी सुंदर होत्या व अलीकडे कुरूप झाल्या आहेत असें नाहीं. सूर्यादि नवग्रह पूर्वी जसे होते तसेच हल्लीं आहेत. काम-क्रोध-लोभादि षड्रिपूंनीं हल्लीं रिपुत्व सोडून शस्त्रसंन्यास केला आहे असें ऐकिवांत नाहीं. मग महाकाव्याला अनुकूल विषय नाहींत या म्हणण्याचा अर्थ काय ? खरा प्रकार असा आहे कीं अभाव काव्यात्मक दृष्टीचा आहे; विषयांचा नाहीं. नैतिक दृष्ट्या ज्याप्रमाणें एखाद्याची विषयवासना क्षीण होते, पण विषय कधीं संपले नाहींत किंवा संपावयाचे नाहींत, त्याप्रमाणेंच काव्यदृष्ट्याहि विषय कधीं संपले नाहींत व संपावयाचे नाहींत. काव्यदृष्टि किंवा काव्यात्मक वृत्ति असेल त्याला विषयांचा कधीं तुटवडा पडला नाहीं, व पडणार नाहीं. प्रेमळ आईला बोबड्या मुलाचें कौतुक करण्याला जसे दुरघडी विषय मिळतात, किंवा प्रेममोहित तरुणाला ज्याप्रमाणें आपल्या प्रेमविषयक रमणीमध्यें क्षणोक्षणीं रमणीय नवता भासमान होते, त्याप्रमाणेंच लघुकाव्याला किंवा महाकाव्याला अनुकूल असलेली दृष्टि व वृत्ति ज्याच्यामध्यें आहे त्याला नवीन नवीन विषयांची वाण पडत नाहीं. पण सावत्र आयांना बोबड्या मुलामध्यें जसें कौतुकास्पद कांहींच दिसत नाहीं, किंवा वेदाभ्यास-जड वृद्धांचें चित्त जसें युवतींच्या लीलांनीं द्रवत नाहीं, त्याचप्रमाणें महाकाव्य-निष्पत्तीला आवश्यक असलेली दृष्टि व वृत्ति ज्यांच्यामध्यें नसते त्यांना अलीक-डच्या जीवनांत महाकाव्याला अनुकूल विषय मिळत नाहींत. काव्यनृत्य करूं शक-णाऱ्याला तारांगण चालतें, रणांगण चालतें, नृपांगण चालतें, व स्मशानांतहि रुंडमालाधर शंकराप्रमाणें तो तांडवादि बीभत्स-भयानकादि रस उत्पन्न करणारें नृत्य करूं शकतो. उच्चतम काव्यनृत्य ज्यांना करतां येत नाहीं त्यांना मात्र सर्वत्र वांकडींच अंगणें दिसतात, विषय दिसतच नाहींत व परिस्थितिच प्रतिकूल असते!

परिस्थितीचा व काव्याचा संबंध काय या मुद्याचा वरील एका वाक्यांतच वास्तविक समारोप करतां येईल. पण एतद्विषयक कांहीं गैरसमज दूर करण्याकरितां थोडासा विस्तार करणें जरूर आहे. अलीकडे पुष्कळ लोकांना असें वाटतें कीं, बऱ्याच गूढ गोष्टींचा कार्यकारणभाव आपणांस कळला आहे. कार्यकारणभाव-विषयक आपलें अज्ञान कबूल करणें मनुष्यमात्राला केव्हांहि जड वाटतें, म्हणून

पूर्वी अज्ञात कारणाला जेथें ‘ देव ’ म्हणत किंवा ‘ दैव ’ म्हणत, तेथें अलीकडे हे शब्द मागें पडत जाऊन त्यांचेऐवजीं ‘ परिस्थिति ’ हा शब्द वापरण्यांत येतो. कित्येक वेळां ‘ परिस्थिति ’ हें कारण असतें खरें, पण कित्येक वेळां या शब्दानें ज्ञानाचा केवळ आभास उत्पन्न होतो व कित्येक वेळां तर ‘ परिस्थिति ’ हें कारण नसून उलट कार्य असतें ! बीज आधीं कीं फळ आधीं या वादाप्रमाणें या वादाची बहुधा स्थिति असते.

हा वाद वाङ्मयक्षेत्रांतच नव्हे तर आधिभौतिक शास्त्रांत, राजकारणांत, समाजकारणांत व इतरत्रहि दिसून येतो. आधिभौतिक शास्त्रांत प्राणिवर्गाचा विकास कसा झाला याची उपपत्ति लावतांना लामार्क ( Lamarck ) व डार्विन यांच्या ( सामान्यतः प्रतिपादण्यांत येणाऱ्या ) ‘ परिस्थिति ’वादी मताविरुद्ध Vitalism, Creative Evolution वगैरे तत्त्वें प्रतिपादण्यात येतात. राजकारणांत, इतिहासशास्त्रांत, समाजकारणांत महाभारतांत म्हटल्याप्रमाणें ‘ **कालो वा कारणं राज्ञः राजा वा कालकारणम्** ’ हा प्रश्न निरनिराळ्या स्वरूपांत दृष्टोत्पत्तीस येतो व त्याचें उत्तर ‘ **राजा कालस्य कारणम्** ’ असें, किंवा ‘ **कालोऽस्ति कारणं राज्ञः** ’ असें निरनिराळ्या लोकांकडून देण्यांत येतें. असला कठीण, व्यापक व गुंतागुंतीचा प्रश्न एकदोन पृष्ठांत आवरणें अशक्य आहे. तथापि अर्धवट सूत्रात्मक पद्धतीनें माझ्या मताचें दिग्दर्शन वाङ्मयक्षेत्रांतील उदाहरणें घेऊन करतां येईल.

महाराष्ट्रांतील संतवाङ्मयांत जी निवृत्ति दिसून येते तिला परिस्थिति कितपत कारणीभूत झाली हाच एक मर्यादित प्रश्न हातीं घेतला तर माझें म्हणणें थोडक्यांत सुचवितां येईल. ‘ काव्य आणि काव्योदय ’ या पुस्तकांत प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन यांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं राजकीय दुःस्थितीमुळें हा निराशावाद उत्पन्न झाला. पण कै. वि. का. राजवाडे यांचें मत कवींच्या निराशा-वादामुळें राजकीय दुःस्थिति आली असें एके काळीं होतें ! शिवाजीच्या आधींचा काळ जुलमाचा व अंदाधुंदीचा होता म्हणून रामदास उत्पन्न झाले व शिवाजीहि या परिस्थितीमुळेंच उत्पन्न झाला व कार्य करूं शकला असें कांहीं म्हणतात, तर यांच्या उलट शिवाजी व रामदास या दोघांनीं ( सहकारितेनें म्हणा किंवा स्वतंत्रतेनें म्हणा ) काळाचा ओघ बदलला व नवीन काल निर्माण केला असें कांहींजण

प्रतिपादितात ! कालौघाकडे जर कर्तृत्व असतें, तर कालौघामुळें ' रामदास ' व ' तुकाराम ' अशीं परस्परविरोधी कार्यें कशीं झालीं ? दैन्याच्या, छळाच्या व दुर्दशेच्या काळांत ( व काळांतच नव्हे तर काळामुळें ) निवृत्तिपर कवी झाले असें म्हणावयाचें, तर छत्रपतींच्या राज्यारोहणाच्या काळांत, किंवा पेशवाईतल्या अटकेपार झेंडा नेणाऱ्या काळांत ( व काळामुळें ) प्रवृत्तिपर कवी निर्माण व्हावयास पाहिजे होते. पण रामदासांशिवाय दुसरें नांवच चटकन् डोळ्यांपुढें येत नाहीं. शिवाजीच्या पूर्वीहि महाराष्ट्रानें ' पुलकेशी ' राजाच्या द्वारें पराक्रम गाजविला होता; त्या वेळस किंवा लगेच तदनंतर आशावादी कवी कोणते व किती झाले ? परिस्थितीकडे कर्तृत्व मानलें तर दुसऱ्या बाजीरावाच्या शिमगी चांदण्याच्या व मैना-राघूंच्या काळांत तमासगीर जसे झाले, तसे मोरोपंतासारखेहि कवि कां निर्माण व्हावे, हा प्रश्न उत्पन्न होतो. परिस्थिति व व्यक्तिवैशिष्ट्य या दोहोंचा संघात किंवा संयोग हें कारण मानलें तर वरील कांहीं कूटें कांहीं अंशीं सुटतील,—अथवा खरें बोलायचें म्हणजे, सुटल्यासारखीं वाटतील ! परिस्थिति कारणीभूत होत असली तर ती कशी होते हें जोंपर्यंत सांगतां येत नाहीं तोंपर्यंत तिचें कारणत्व स्वीकारण्यांत किंवा नाकारण्यांत विशेष अर्थच नाहीं. कार्यकारणभाव समजल्याचें माध्यात्मक समाधान पाहिजेच असलें तर परिस्थिति ही ' कांहीं अंशी व एका अर्थानें ' कारणीभूत होते असें म्हणून मोकळें व्हावें !

परिस्थिति कारणीभूत झाल्याचीं प्रो. वा. ब. पटवर्धन यांनीं दिलेलीं कांहीं उदाहरणें परीक्षणाकरितां घेऊं या. ' भोंवतालची देशरचना जशी असेल त्याप्रमाणें कवितेची चालचलणूक असते ' असें ते म्हणतात. आणि अर्थविवरणार्थ टीपेंत अशी पुस्ती जोडतात कीं, ' भूप्रदेश, देशरचना आणि हवापाणी यांचे गुणकर्मांचा कवींच्या मनावर परिणाम होतो तो, त्या त्या कवींच्या स्वभावाप्रमाणें किंवा मनःप्रवृत्तीप्रमाणें भिन्न भिन्न होतो. ' या सिद्धान्ताच्या द्वारें प्रो. पटवर्धनांना असें का सांगावयाचें आहे, कीं नित्य दिसणाऱ्या हिरवळीमुळें स्वभावांत हिरवटपणा येईल, किंवा प्रदेशाच्या रुक्षतेमुळें स्वभावांत रुक्षता येईल किंवा उंच पर्वतांच्या सान्निध्यामुळें स्वभावांत उच्चत्व येईल, किंवा हिमालयाच्या जवळ राहिल्यानें स्वभावांत थंडपणा येईल'? माझा हा प्रश्न विडंबनात्मक वाटेल व थोडासा आहेहि. पण हें विडंबन थोडेंसें आवश्यक आहे, कारण पुष्कळ लोकांच्या मनांत या प्रश्नाच्या

बाबतींत गोंधळ असतो तो दूर करण्याला असलें विडंबन आवश्यक आहे. प्रो. पटवर्धनच उपरिनिर्दिष्ट टीपेंत म्हणतात—

" रुक्ष प्रदेश, नीरस भूरचना, सदा बदलणारी हवा, धबधब्याचा आवाज वगैरे गोष्टींच्या साहचर्यामुळें वर्डस्वर्थ कवीचा स्वभाव सरळ, साधा, गंभीर, न डगमगणारा, प्रसंगाला निमूटपणें तोंड देणारा, धिमा आणि नीरस किंवा विनोद-शून्य झाला असें म्हणावयास जागा आहे. परंतु त्याच किंवा तशाच धबधब्यांच्या, विजांच्या, वावटळींच्या, झंझावातांच्या संगतीमुळें शेले, बायरन यांच्या वृत्ती उद्दाम, बेधडक मुसंडी मारणाऱ्या झाल्या असाव्या. " [काव्य आणि काव्योदय, पृष्ठ २०]

वरील अवतरणांतील हेत्वाभास दाखविण्याकरितां एक कल्पित गोष्ट सांगणें सोईचें आहे. कांहीं मंडळी एका बागेंत गेली असतां त्यांना एक गुलाबाचें झाड दिसलें. त्यांतील एकानें गुलाबाचें एक मोठें फूल तोडून हुंगलें; दुसऱ्यानें एक अर्धविकसित फूल तोडून बटनहोलमध्यें घातलें; तिसऱ्यानें पाकळ्या तोडून टाकण्यास आरंभ केला; चवथ्यानें " या गुलाबाचें फ्रेंच नांव कायसेंसें आहे तें काय बरें ? " असें म्हटलें व डोकें खाजविण्यास आरंभ केला; पांचव्यानें आमच्याकडे या फ्रेंच जातीचा गुलाब नाहीं, पण दुसऱ्या जातीचा आहे असें म्हटलें; सहाव्यानें आपल्या मुलीकरितां कांहीं फुलें तोडलीं; सातव्यानें आपल्या सहचरीला एक फूल तोडून दिलें व आठव्यानें गुलकंदाकरितां कांहीं फुलें तोडून हातरुमालांत घातलीं ! नववा मागें मागें रेंगाळत होता त्याचें कारण असें कीं, त्याला आपल्या गत प्रियतमेच्या गुलाबी गालांची व हास्याची आठवण होऊन तो उदास झाला होता; आणि दहावा गालांतल्या गालांत हंसत तेथेंच उभा होता, कारण त्याला गडकऱ्यांच्या ' गुलाबी कोडया ' ची आणि केशवकुमार अत्र्यांच्या ' प्रेमाच्या गुलकंदा ' ची त्याच वेळीं आठवण झाली ! आतां प्रस्तुत गुलाबाचें झाडच तेथें नसतें तर गुलाबाच्या संबंधीं या भिन्न वृत्ती व हीं भिन्न कर्में शक्यच नव्हतीं; तेव्हां ' गुलाबाचें झाड ' ही परिस्थिति या सर्व कार्यांचें कारण आहे. आणि यावर कोणी जर आक्षेप घेऊं लागला कीं एकच कारण भिन्न कार्यें कशीं घडवून आणतें, तर प्रो. पटवर्धनांप्रमाणें ' स्वभावभेदामुळें ' हें उत्तर सांगून मोकळें व्हावें ! उपरिनिर्दिष्ट दहाहि कार्यें गुलाबाच्या झाडाच्या अभावीं अशक्य होतीं, तेव्हां या अर्थानें तें झाड ' कारण ' या संज्ञेस पात्र असलें, तरी या झाडामुळें हीं कार्यें घडलीं या म्हणण्या-

पासून कांहीं तरी बोध होतो का ? प्रो. पटवर्धनांनीं रुक्ष प्रदेश, नीरस भूरचना, वगैरेंना वर्डस्वर्थ कवीच्या व शेलेच्या स्वभावाचें एक कारण कल्पिलें आहे तें वरच्यासारखेंच एका अर्थानें खेरेंहि आहे व बोध-रहितहि आहे !

महाकाव्याच्या निर्मितीला परिस्थिति प्रतिकूल आहे या मुद्द्याचा आतां अधिक विस्तार न करतां अलीकडची अभिरुचीच बदलली आहे या मुद्द्याकडे वळूं या. अभिरुचि बदलली ती महाकाव्याच्या अ-निष्पत्तीमुळें बदलली, कीं अभिरुचि बदलली म्हणून महा-काव्यें निर्माण होत नाहींत, हा येथें प्रश्न उत्पन्न होईल. त्याचप्रमाणें लोकांना अभिरुचि नसली म्हणून विशिष्ट वाङ्मयाची निष्पत्ति तद्भक्तांकडून होण्याची अजीबात थांबते कीं काय, हाहि विचार करण्यासारखा प्रश्न आहे. पण पूर्वीच्या विवेचनाची दिशा ज्याला कळली आहे त्याला या मुद्द्यांचा विस्तार करण्याची जरूर भासणार नाहीं, या विचारानें सदर विस्तार टाळण्याचें ठरविलें आहे.

अलीकडे-महाकाव्यें-निर्माण न होण्याचें कारण म्हणजे निर्माण करण्यास समर्थ असलेली प्रतिभा अलीकडे दिसत नाहीं असें जर मी म्हटलें तर कांहीं लोक कुचेष्टनें ‘ हें सांगायला तुम्ही नको ’ असें मनांत म्हणतील, कारण ‘ कार्यनिर्मितिसमर्थ कारण नाहीं, म्हणून कार्य नाहीं ’ असें म्हणण्यासारखेंच तें होईल. पण याशिवाय दुसरें उत्तर देणें कठीण आहे. कारण प्रतिभा कशी, केव्हां, कोणत्या कारण-संघाताच्या योगें, उत्पन्न होते हें जोंपर्यंत आपणास सांगतां येत नाहीं तोंपर्यंत या प्रश्नाचा उलगडा होणें शक्य नाहीं. तथापि निराश न होतां या प्रश्नाचा आपण जर विचार करूं लागलों तर पुढील कल्पना सुचतील, व त्या कांहींना ग्राह्य वाटतील.

महाकाव्य-निर्मिति-समर्थ प्रतिभा असल्यावर ती कोणत्याहि परिस्थितींत तसलें काव्य लिहील हें जरी खरें असलें, व तिच्या अभावीं कोणत्याहि परिस्थितींत उत्तम महाकाव्य उत्पन्न होणार नाहीं हें. जरी खरें असलें (लांबलचक व भुरळ घालणारी भाषा टाकून बोलायचें म्हणजे महाकाव्यें कशीं उत्पन्न होतात व कां होत नाहींत हें जरी सांगतां येत नसलें ! ), तात्पर्य, प्रतिभेची निर्मिति कशी होते हें गूढ व दुर्ज्ञेय असलें, तरी सद्यःकालीन सुसंस्कृत समाजाची मनःस्थिति अलीकडे कशी झाली आहे याचें दिग्दर्शन करून अलीकडे महाकाव्यें निर्माण करण्यास समर्थ असलेली प्रतिभा कां दिसत नाहीं याचें एक कारण सुज्ञांच्या विचाराकरितां सुच-

वितां येईल. अलीकडे बाह्य परिस्थितीमध्यें सापेक्षतः स्थिरता व निश्चितता आली आहे, पण अंतःसृष्टि ढांसळत चालली आहे, आणि अतिशयोक्ति करून बोलायचें म्हणजे तेथें बेबंदशाही किंवा अराजकता माजूं पाहते आहे. जगाचा आपणांला अर्थ कळेनासा झाला आहे; अज्ञात लिपींत व भाषेंत लिहिलेल्या सुप्रसिद्ध काव्या-प्रमाणें जग हें आपणांस एका अर्थी सार्थ व रम्य असावेंसें वाटतें, पण हा अर्थ व हें रम्यत्व हीं अनुभवाला तर पटत नाहींत, तेव्हां या विश्वात्मक ग्रंथाकडे आपण केवळ साश्चर्य व कुतूहलयुक्त दृष्टीनें पाहतों, पण त्यापासून समाधान, उत्साह, प्रसन्नता, स्फूर्ति याचा लाभ मिळत नाहीं. His master's voice ( 'धन्याचा आवाज' ) या नांवाच्या फोनोग्राफच्या जाहिरातींत एक कुत्रा दाखवितात, तो आपल्या धन्याचा आवाज तर ओळखतो, पण तो कोठून कसा येतो हें त्याला समजत नाहीं, व खरोखरचा धनी बोलतो आहे कीं हा भ्रम आहे असा त्याला प्रश्न पड-लेला दिसतो, त्याप्रमाणेंच आपली स्थिति झाली आहे; म्हणजे जगाकडे पाहून व त्यांतील 'ध्वनि' ऐकून तो आपणाला ओळखीच्या सारखा तर वाटतो, जगदी-श्वराचा असावा असें तर वाटतें पण निश्चय मात्र कांहीं एक करवत नाहीं, अशी आपली स्थिति झाली आहे !

अलीकडे धर्माच्या बाबतींत काय किंवा राजकीय व इतर बाबतींत काय, मतामतांचा गलबला आहे; सर्व कल्पना संशयास्पद झाल्या आहेत; कोणतीहि गोष्ट अशी नाहीं, कीं तिला जोराचा धक्का मिळालेला नाहीं. अशा मनःस्थितींत कशाचा विशेष राग—लोभ नसतां, कशाबद्दल विशेष अगत्य किंवा उत्साह वाटत नाहीं, कांहींहि विशेष आदरणीय व पूज्य वाटत नाहीं. परंपरेचे संस्कार राहिले आहेत, पण ते पुसट होत चालले आहेत. नवीन संस्कार कोणते करावयाचे हेंच निश्चित नसल्यामुळें कोणालाहि त्यांचें अगत्य नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अली-कडच्या शास्त्रीय युगांत बाह्य परिस्थितीमध्यें सापेक्षतः स्थिरता व निश्चितता, पण अंतःसृष्टीमध्यें अस्थिरता व अराजकता उत्पन्न झाली आहे. अशा मनःस्थितींत कोठल्याहि क्षेत्रांत मोठा पराक्रम कसा होणार ?

सध्यां आपणाला लहान लहान कर्तव्यें, लहान लहान प्रश्न, लहान लहान सौंदर्यें दिसतात, पण विश्वव्यापक कर्तव्यें, समुद्रगंभीर प्रश्न व विराट्स्वरूपी सौंदर्यें कल्प-नेलाहि अगम्य झालीं आहेत; कारण धर्मावरचीच नव्हे तर नीतीवरची श्रद्धा उडालेली

आहे, आधिभौतिक शास्त्रांवरची उडालेली आहे, आणि सौंदर्य-विषयक औचित्यांवरचीहि उडालेली आहे. पूर्वीच्या श्रद्धा, निष्ठा, भावना, कल्पना पार गेल्या असें म्हणण्यांत अतिशयोक्ति असेल; पण त्या जात चालल्या आहेत यांत काडीमात्र कांहीं खोटें नाहीं. ज्या भाव-भावनांच्या व विचार-विकारांच्या प्रेरणांनीं रामायणांतील व महाभारतांतील व्यक्तींना त्या त्या प्रसंगीं तें तें मानण्यास, बोलण्यास आणि करण्यास लावलें, त्या भाव-भावना व ते विचार-विकार आतां जीर्ण होत चालले आहेत. राम-रावणांच्यासारखें युद्ध यापुढें शक्य दिसत नाहीं. कारण 'देव' नष्ट होत चालले आहेत व राक्षसांची जातहि नाश पावते आहे. आतां आपणांला सर्वत्र 'मानव' दिसत आहेत. गेल्या महायुद्धांत जर्मन लोकांना इंग्लिश लोक 'हूण' वगैरे शिव्या व्याख्यानांत व वर्तमानपत्रांत देत असत, पण हें सर्व ओंठावरचें होतें; पोटांत इंग्लिश लोक ओळखून होते कीं जर्मन लोक आपल्यासारखेंच आहेत! तसेंच गेल्या सत्याग्रहयुद्धात देव-दानवांच्या युद्धाविषयीं भारत-रामायणादिकांत वर्णन केलेला प्रकार दृष्टीस पडत नाहीं, व पडणार नाहीं. कारण गांधी हे इंग्रजांचा द्वेष करूं नका असें स्पष्ट सांगत आहेत व इंग्रजहि गांधींना शिव्या देतांना आढळत नाहींत. हिंदुमुसलमानांचे दंगे अजून होतात, पण रामदासांना किंवा शिवाजीला जें वाटत होतें तें आपणांला वाटत आहे काय? नीतीच्या बाबतींत हेंच आणि रसिकत्वाच्या बाबतींतहि तेंच. 'नागडा पंथ' जर्मनीमध्यें निघालेला वर्तमानपत्रांत आपण वाचतों, पण त्याबद्दल विशेष राग येत नाहीं. त्याचप्रमाणें प्रो. र. धों. कर्वे यांनीं 'समाज-स्वास्थ्य' या मासिकावर नग्नप्राय स्त्रीचें चित्र छापलें, किंवा 'रत्नाकरा'नें "ओलेती" हें चित्र छापलें, तर त्याबद्दल आपण विशेष त्वेषानें बोलत नाहीं. मतभेदाचा हा प्रश्न आहे असें आपण समजतों व प्रश्न तेथेंच सोडून देतों, झालें! सध्यांच्या काळीं आपली अशी मनःस्थिति झाली आहे कीं आपली कशावर विशेष उत्कट श्रद्धा नाहीं; निष्ठा नाहीं; नित्यत्वानें किंवा निश्चयानें आदरणीय किंवा पूज्य असें विशेष कांहीं राहिलें नाहीं; भूतकाळावर श्रद्धा नाहीं; भविष्यकाळावर विश्वास नाहीं; वर्तमानकाळांत समाधान नाहीं; निश्चित सिद्धान्त नाहींत, निश्चित आकांक्षा व ध्येयें नाहींत; निश्चित स्नेह किंवा द्वेष नाहीं; निश्चयानें मन आनंदविणारीं किंवा दुखविणारीं स्थळें किंवा कारणें नाहींत; निश्चयानें विशिष्ट लोकांना बळकट जोडणारीं किंवा कायमचीं तोडणारीं सत्कर्में

किंवा दुष्कर्में नाहींत; तर सर्वत्र अनिश्चय, संशय, ढिलेपणा, गुळमुळीतपणा व चालढकलपणा दिसत आहे ! *

हें मानसिक पृथक्करण सर्व व्यक्तींना पूर्णपणें लागू पडणार नाहीं. पण ज्या सुशिक्षित वर्गांतून महाकाव्यें निर्माण करणारे किंवा वाचणारे निघावयाचे त्या वर्गांतील बहुतेकांना वरील वर्णन कमीअधिक मानानें लागू पडेल असें वाटतें. हें जर खरें असेल,—ज्या उच्च, व्यापक, सोत्साह व आत्मप्रत्ययपूर्ण वृत्तीनें व दृष्टीनें पाहिल्याशिवाय महाकाव्याची निष्पत्ति होऊं शकत नाहीं ती दृष्टि अलीकडे फारशी दिसत नाहीं हें जर मान्य असेल—तर महाकाव्यांच्या निर्मितीचे प्रयत्न कां होत नाहीत व झाल्यास ते यशस्वी कां होत नाहींत हें थोडेंसें कळेल. अलौकिक ' प्रतिभा ' हल्लींच्या युगांतहि हल्लींच्या युगाला रुचेल व पटेल असें महाकाव्य रचील यांत शंकाच नाहीं; पण प्रतिभेचा प्रश्न गूढ असल्यामुळें त्याचा विचार बाजूला ठेवून सामान्यदृष्टीनें हें विवेचन केलें आहे. महाराष्ट्रांतील हल्लींच्या कवींना, कादंबरीकारांना, नाटककारांना, निबंधकारांना, तत्त्वज्ञांना सामान्य दर्जाची लहान लहान सत्यें व सौन्दर्यें दिसतात व तीं त्यांना सांगावींशीं वाटतात. आणि म्हणूनच काव्यक्षेत्रापुरतें पाहवयाचें म्हणजे भावगीतादि लघुकाव्यप्रकार अलीकडे प्राचुर्यानें दिसत आहेत. यांत अनुचित असें कांहींच नाहीं. उलट उच्चतर, गंभीरतर व व्यापकतर सत्याकडे व सौन्दर्याकडे जाण्याचा हा एक मार्ग आहे व तो अभिनंदनीय आहे.

---

* वरील लेख भोरच्या युवराज-युवराज्ञीच्या ' निर्झरिणी ' नांवाच्या कवितासंग्रहाला कांहीं वर्षांपूर्वी मी लिहिलेल्या प्रस्तावनेंतला एक भाग आहे. फर्ग्यूसन कॉलेजांतील प्राध्यापक रा. श्री. जोग यांनीं ' लोकशिक्षण ' मासिकाच्या ऑगस्ट १९४० च्या अंकांत महाकाव्याच्या अनिर्मितीची मीमांसा करतांना विवेकवाद (Rationalism) आणि अज्ञेयवाद (agnosticism) यांचा प्रसार हें कारण दिलें आहे तें वरील विवेचनाशीं सुसंगत आहे. त्यांनीं कांहीं वर्षांपूर्वीं एका व्याख्यानांत दुसरी एक उपपत्ति सुचविली होती ती उल्लेखनीय व मननीय आहे. काव्यस्फूर्ति ही अल्पकाल टिकणारी असते, तेव्हां भावगीतांसारखीं लघुकाव्यें निर्माण होणें साहजिक आहे असा त्यांच्या म्हणण्याचा आशय दिसतो. त्यांचें मत मला मान्य नाहीं. विस्तारानें चर्चा करण्यासारखें तें असलें तरी आतां ती करीत नाहीं.

९।८।४०                वा. म. जो.

# केळकर व कांहीं साहित्यविषयक प्रश्न

कित्येक लोक क्रिकेट, टेनिस वगैरे खेळ उत्तम खेळतात. पण त्यांच्यापैकीं प्रत्येकाला त्या त्या खेळाविषयीं सशास्त्र, सुंदर व मनोरंजक चर्चा करतां येईल असें नाहीं. शिक्षक, सेनापति, मुत्सद्दी वगैरेसंबंधीं असेंच आहे; म्हणजे आपआपलीं कामें चांगलीं करणारे जे असतात त्या सर्वांना आपआपल्या कामाची मार्मिक मीमांसा साधेलच असें नाहीं, तर ती त्यापैकीं कांहींनाच साधते. साहित्यांतील काव्य-नाटकादि जे प्रकार आहेत त्यांत नामांकित कामगिरी करून दाखवून पुनः तद्विषयक चर्चा करणें फारच थोडयांना साधते. कालिदास, भवभूति, ज्ञानदेव, तुकाराम, मोरोपंत, इत्यादिकांनीं रसपूर्ण काव्यें लिहिलीं, पण रस-चर्चा त्यांना कांहीं साधली नाहीं—प्रयत्न करून साधली नाहीं असें नव्हे—तर त्यांनीं या दिशेनें प्रयत्नच केला नाहीं.

पण ग्रीस देशांतील प्लेटो, किंवा जर्मनींतील गटे, किंवा इंग्लंडमधील वर्ड्स्वर्थ, शेली, किंवा संस्कृतमधील रसगंगाधरकार जगन्नाथ कवि, किंवा महाराष्ट्रांतील श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, यांच्यासारखे असे कांहीं थोडे साहित्यभक्त असतात कीं त्यांना दोन्ही गोष्टी साधतात. नेपालिअनप्रमाणें साहित्यक्षेत्रांतील ते पराक्रम करतात; इतकेंच नव्हे तर तद्विषयक विवेचनहि ते करतात. किंवा हाच अर्थ निराळ्या तऱ्हेनें सांगावयाचा म्हणजे साहित्य—क्षेत्रांतील ते कर्मयोगी व ज्ञानयोगीहि असतात. नरसिंह चिंतामण केळकर हे अशांपैकींच आहेत.

यापुढें जाऊन मला असेंहि म्हणावेंसें वाटतें कीं, वाङ्मयक्षेत्रांतील ते खरे 'भक्ति-योगी'हि आहेत. ईश्वरविषयक भक्तीच्या बाबतींत त्यांना मागें टाकणारे महाराष्ट्रांत आज पुष्कळ लोक सांपडतील; पण वाङ्मयविषयक भक्तीच्या बाबतींत त्यांची

बरोबरी करणारा श्री. कृ. कोल्हटकरांशिवाय मला कोणी दिसत नाहीं,—आतांपर्यंत तरी कोणी झालेला नाहीं, पुढें कोणीहि होणार नाहीं असें कोण कशाला म्हणेल ?

लोकमान्य टिळक, भारताचार्य चिंतामणराव वैद्य, वगैरे अधिक विद्वान् किंवा बहुश्रुत असतील; कवि या दृष्टीनें किंवा नाटककार किंवा निबंधलेखक किंवा लघुकथालेखक या नात्यानें त्यांच्याहून अधिक योग्यतेचे लोक कांहीं आहेत; पण सुंदर आणि अनेकविध वाङ्मयकलाकृति करून त्यांच्या स्वरूपाविषयीं, लक्षणां-विषयीं वगैरे रसपूर्ण व मार्मिक मीमांसा करणारे आणि सर्वांत अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे वाङ्मयात्मक रसाची खरी भक्ति करणारे महाराष्ट्रांत किती आहेत ? केळकरांची ही भक्ति त्यांच्या अंगांत इतकी बाणलेली आहे कीं राजकारणासंबंधीं, समाजकारणासंबंधीं, शिक्षणासंबंधीं किंवा इतर कोणत्याहि विषयासंबंधानें ते विचार करूं लागले किंवा लिहूं-बोलूं लागले म्हणजे मूळ प्रसंगाच्या विवेचनाला अनुरूप अशा सात्त्विक संतापादि भावनांवर देखील वाङ्मयात्मक रसास्वाद-लालसेचें प्राबल्य होऊन मूळ भावनेचें रूपान्तर होतें. मी काय म्हणतों तें उदाहरणें देऊन स्पष्ट करतों. लोक-मान्य टिळक हे राजकीय किंवा सामाजिक प्रतिपक्षावर टीकालेख लिहीत आहेत अशी कल्पना केली तर कोणाची दयामाया न ठेवता—' आडवें आलें तर पोटचें देखील कापलें पाहिजे ' अशा हट्टास पेटून प्रतिपक्षावर लेखनात्मक हल्ला करीत आहेत असा देखावा कल्पनाचक्षूंपुढें दिसेल. पण तशाच परिस्थितींत केळकर लिहीत आहेत अशी कल्पना केली तर प्रतिपक्षावरचा माझा हल्ला जोराचा तर झालाच पाहिजे पण वाङ्मयदृष्ट्या सुंदरहि झाला पाहिजे अशा भावनेनें ते लिहीत आहेत असा देखावा आपणांस दिसेल. आपल्या युक्तिवादानें व प्रहारांनीं प्रतिपक्षी चीत झाला पाहिजे हा टिळकांचा मुख्य प्रश्न व त्याला चीत केलें असें मनाला वाटलें म्हणजे ' चीत कसें केलें ' यापेक्षां ' चीत केलें ' यांतच त्यांना अधिक धन्यता वाटावयाची. केळकरांना प्रतिपक्ष्यास चीत करण्यात अर्थात् आनंद होईलच, पण वाङ्मयदृष्ट्या कशा सुंदर रीतीनें प्रतिपक्ष्याचा युक्तिवाद उलटविला, कशा चातुर्यानें त्याच्या पेचांतून सुटलों, नाइलाज म्हणून निर्दयपणा स्वीकारून जीव घेणारा टोला जो लगावला तो किती सफाईनें लगावला, सरकारच्या जबरदस्तीमुळें टीकात्मक लेखन म्हणजे तारेवरचें काम किंवा सुळावरची पोळी अशी स्थिति ओळखून आपण कसें अंग संभाळून व किती खुबीनें वाग्बाणांचे

प्रहार केले—या व अशा विचारांपासून उत्पन्न होणाऱ्या वाङ्मयविषयक स्वसामर्थ्य-प्रतीतीमुळें त्यांना अधिक आनंद होईल, व आपल्या युक्तिवादांतील, भाषेतील, कोट्यांतील वगैरे सौंदर्य पाहून तद्विषयक रसास्वाद घेण्यांत तर ते विशेष रममाण झालेले आपल्या कल्पनेला दिसतील. निदान माझ्या कल्पनेला ते तसे दिसतात. आपण प्रतिपक्ष्यावर केलेला वार कारीगर न होतां तो निसटला हें पाहून टिळकांना जें दुःख वाटलें असतें तें 'आपण वार किती सफाईदार केला होता' या जाणीवेनें विशेष कमी झालें नसतें.—त्यांच्या अंगीं बाणलेल्या गीतोपदिष्ट तत्त्वज्ञानानें तें जितकें कमी झालें असतें तितकें तें वरील जाणिवेनें कमी झालें नसतें. केळकरांचा वार प्रतिपक्षानें चुकविला तर त्यांनाहि दुःख होईलच, पण गीतोपदिष्ट तत्त्वज्ञानापेक्षां स्वकीय वाक्पटुत्वाच्या जाणिवेनें तें त्यांना अधिक सह्य होईल. किंबहुना मी असेंहि म्हणूं शकेन कीं, केळकर हे निसटून जाणाऱ्या प्रतिपक्ष्याच्या वाक्कौशल्याची तारीफहि करूं शकतील. क्रिकेटच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे आपण फेंकलेल्या चेंडूमुळें शत्रूची वुइकेट जरी मिळाली नाहीं, किंबहुना त्यानें तो चेंडू बाऊंडरीवर दवडला, तरी देखील ते स्वतःचा चेंडू चांगला फेंकला गेला असल्यास त्यांतलि कौशल्याचें व असा चेंडू तटविणाऱ्या किंवा मारणाऱ्या शत्रूच्या शहामतीचें क्षणभर कौतुकच करतील व मागूनहि न लाजतां याबद्दल गप्पागोष्टी करतील. 'कुळकर्णी-लीलामृतांत' रा. पाटील यांनीं प्रत्यक्षतः कुळकर्ण्यांवर व अप्रत्यक्षतः ब्राह्मणवर्गावर जो ताशेरा उडविलेला आहे त्यावरील केळकरांचा लेख वाचला म्हणजे आपली वुइकेट घेणाऱ्या प्रतिपक्ष्याच्या कौशल्याची ते तारीफ करूं शकतात हें कळून येईल. अच्युत बळवंत कोल्हटकर यांचें व केळकरांचें बरेंचसें बिनसलें असतां देखील केळकर हे अच्युतरावांच्या लेखनशैलीची व वाक्पटुत्वाची प्रांजलपणें स्तुति करीत, यावरूनहि हाच मुद्दा सिद्ध होतो कीं, केळकरांना वाङ्मयात्मक विलास इतके प्रिय आहेत कीं या विलासांच्या निमित्तानें शत्रु त्यांना घाव मारूं लागला तर बचाव करतां करतां ते घाव घालणाऱ्याच्या चतुराईचें मनांत कौतुक करूं शकतात व योग्य वेळीं जनांतहि मनांतलें कौतुक बोलून दाखवूं शकतात.

वरील क्रिकेटचे वगैरे दाखले घेऊनच कांहीं लोक केळकरांवर असा आरोप करतील कीं, राजकीय, सामाजिक वगैरे रणांगणांस केळकर हे वाङ्मयात्मक क्रीडांगण

समजून वागतात व त्या त्या प्रसंगाला अनुरूप अशा गंभीर भावना व कर्मप्रवृत्ति त्यांमध्यें हीनबल आहेत. पण असें म्हणणें म्हणजे माझ्या म्हणण्याचा विपर्यास करणें होईल. प्रश्न सध्यां गौण म्हणून इतर भावना सोडून देऊन फक्त सात्त्विक संतापाचाच विचार केला तर मला उदाहरणांनीं असें सिद्ध करून देतां येईल कीं, वरील आरोप चुकीचा आहे. सरकारच्या दडपशाहीसंबंधानें लिहितांना 'मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं असें देवच बोलून चुकलेला आहे' असें व्यंग्यार्थपूर्ण वाक्य काय सात्त्विक संतापाशिवाय लेखणींतून बाहेर पडेल? म. रा. बोडस यांच्यावर लेख लिहून 'म. रा. बों.' चें 'बोडण' केळकरांनीं जें बाहेर काढलें होतें, शिवरामपंत परांजप्यांनीं 'ध्रुवाची गोष्ट खोटी' अशा प्रकारचा मथळा देऊन लिहिलेल्या गोष्टींवर त्यांनीं जी गोष्ट लिहिली होती, खाडिलकरांच्या मेनकेंत जी राजकीय कुचेष्टा आली होती तिला प्रत्युत्तर म्हणून त्यांनीं जें लिहिले होतें, प्रो. फडके व प्रो. घारपुरे यांनीं १९२१ च्या राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींत केळकरांवर जे आरोप केले होते त्यांवर केळकरांनीं शिवाजी–मन्दिरात दोन दिवस जीं भाषणें केलीं—या व अशा उदाहरणांचा विचार केला म्हणजे केळकराना संसार म्हणजे केवळ वाङ्मय–क्रीडांगण वाटत नसून प्रसंगानुसार भावनावश होऊन चार हात करणारे ते आहेत हें कोणालाहि कबूल करावें लागेल. पण या प्रसंगीं देखील भावनावशतेच्या अनुषंगानें वाङ्मयात्मक रसास्वादलोलुपता दृग्गोचर होतेच, हें ते ते लेख किंवा तीं तीं व्याख्यानें वाचीत असतांना वाचकांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहणार नाहीं.

आणि याचें खरें कारण असें कीं, ते कांहींहि करूं लागले तरी त्यांची वाङ्मयभक्ति डोकावतेच व आपली सत्ता गाजवतेच, इतकी त्यांना ती प्रिय, सहज व दुर्दम्य आहे. अमुक एक प्रसंगावर ते लिहूं किंवा बोलूं लागले आहेत आणि त्यांनीं त्याला यथार्थ व सुंदर उपमादि अलंकारांनीं सुशोभित केलेलें नाहीं असें झालेंच नाहीं. इंग्लिश वाङ्मयांत 'मिडास' नांवाच्या एका राजाची एक गोष्ट आहे. या राजाविषयीं असें म्हटलेलें आहे कीं, त्याचा ज्याला स्पर्श होई तें सर्व सुवर्णमय होऊन जाई. केळकरांचा हस्तस्पर्श असाच आहे,—जो विषय ते हातीं घेतात तो सुवर्णालंकृत होतो! किंवा आपल्या इकडील वाङ्मयांत युवतींचा हस्तस्पर्श झाल्यावर लवकरच विशिष्ट वृक्ष फलपुष्पयुक्त होतात असा जो एक कविसंकेत

आहे त्याचा आधार घेऊन मला असें म्हणावेंसें वाटतें कीं, एखादा रुक्ष विषयवृक्ष वाङ्मयपुष्पांनीं प्रफुल्लित झालेला पाहावयाचा असल्यास केळकरांचा त्याला हस्तस्पर्श करवावा म्हणजे इष्ट हेतु साध्य होईल! कविसंकेताप्रमाणें पाहतां कांहीं विशिष्ट वृक्षांसंबंधींच युवति या प्रभावशाली होतात; पण केळकरांचें प्रभावशालित्व सर्वगामी आहे. केळकर सिमल्याचें वर्णन करोत किंवा विलायतेहून पत्रें पाठवोत; इतिहाससंशोधनाबद्दल चर्चा करोत किंवा 'मराठे व इंग्रज' यांच्या संबंधाचें निरीक्षण करोत; निर्यमक कवितेबद्दल लिहोत किंवा टिळकांच्या आठवणींना प्रस्तावना लिहोत; 'तोतयाच्या बंडा' वर नाटक लिहोत किंवा 'माझी आगगाडी कशी चुकली' याविषयीं लघुकथा लिहोत; 'संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन' करूं पाहोत किंवा वर्तमानपत्रांतील जाहिरातींचें महत्त्व वर्णन करूं लागोत,—जो विषय या साहित्यभक्ताच्या व रसज्ञ ज्ञानयोग्याच्या आणि वाङ्मयकलापटु कर्मवीराच्या हातीं येईल त्यांत बहुश्रुतता, वैदग्ध्य, माधुर्य, सालंकारत्व, रसप्राचुर्य, रसलोलुपता इत्यादि गुणांची भर पडून तो खुलून दिसावयाचाच व फुलून जावयाचाच.

त्यांच्या लिखाणाची विविधता व सुरम्यता पाहून त्याला एखाद्या मोठ्या उद्यानाची किंवा कलात्मक वस्तुसंग्रहाची उपमा द्यावीशी वाटते. या विस्तृत उद्यानाचें किंवा कलात्मक वस्तुसंग्रहाचें निरीक्षण किंवा परीक्षण करावयाचें म्हटलें म्हणजे राजकारणांतील 'फोडा आणि झोडा' या भेदनीतितत्त्वाचा अंगीकार करून एकेका भागाचा एकेकदा समाचार घेतला पाहिजे. आणि या दृष्टीनेंच प्रस्तुत लेखांत केळकरांच्या सर्व वाङ्मयकलाविलासांसंबंधीं न लिहितां त्यांनीं अंतर्मुख होऊन वाङ्मयकृतींबद्दल, म्हणजे त्यांच्या स्वरूपाविषयीं, तत्त्वांविषयीं वगैरे जें बरेंचसें लिहिलेलें आहे त्यापैकीं कांहींचें थोडक्यांत सारांश रूपानें वर्णन करून त्यांतील गुणदोषांचें दिग्दर्शन करावयाचें आहे. प्रस्तुत लेखांत त्यांच्या काव्यांबद्दल चर्चा येणार नाहीं, तर काव्यांविषयीं त्यांनीं काय लिहिलें आहे याविषयीं येईल. त्यांचे गद्यपद्यप्रबंध नानाविध व रसपूर्ण आहेत; पण त्या सर्वांविषयीं न लिहितां गद्यपद्याविषयीं, यमकांविषयीं, काव्याविषयीं, रसास्वादाविषयीं वगैरे त्यांनीं जें लिहिलेलें आहे, त्याविषयीं या लेखांत विवेचन करावयाचें आहे.

केळकरांच्या वाङ्मयमीमांसेला विशेष महत्त्व अनेक दृष्टींनीं आलेलें आहे. राजकारणांत बरेंच महत्त्व असलेल्या 'केसरी'चे ते संपादक होते म्हणून त्यांच्या

प्रत्येक शब्दाला महत्त्व येतें ही गोष्ट खरी असली तरी ती सध्यां माझ्या मनांत नाहीं. मी हा लेख लिहितांना राजकीय दृष्टि अजीबात वगळलेलीच आहे. केळकर यांची वाङ्मयमीमांसा मला विशेष मननीय वाटते ती त्या मीमांसेच्या राजकीयेतर व स्वतःसिद्ध गुणांमुळेंच होय. एक तर वर दर्शविल्याप्रमाणें केळकरांची वाङ्मय-क्षेत्रांत " आधीं केलें मग सांगितलें " अशा प्रकारची स्थिति आहे. ते केवळ टीकाकार नव्हेत, तर कथा–नाटक–निबंधादि वाङ्मय स्वतः लिहून नांव मिळ-विलेले टीकाकार आहेत. काव्यहि त्यांनीं लिहिलेलें आहे व तें उच्चतम दर्जाचें नसलें तरी त्यांत बरेच गुण आहेत. चरित्र, ऐतिहासिक निबंध, प्रवासवर्णनें, वगैरे अनेक प्रकारचे लेख त्यांनीं स्वतः लिहिलेले आहेत. अर्थात् वाङ्मय–निष्पत्ती संबंधीं व वाङ्मयकलेसंबंधीं त्यांना स्वानुभवावरून बोलण्यासारखें पुष्कळ आहे आणि अनुभवाच्या बोलाची केव्हांहि किंमत विशेष असणार.

दुसरी गोष्ट अशी कीं, ते बहुश्रुत आहेत. त्यांनीं मराठी, इंग्रजी व संस्कृत मिळून जितके ग्रंथ वाचले असतील तितके वाचलेले लोक फारच विरळा; महाराष्ट्रांत तरी फारच थोडे. ( माझ्या डोळ्यांपुढें चिंतामणराव वैद्यच तेवढे सध्यां उभे राहत आहेत. ) कायद्यासंबंधीं व वर्तमानपत्रांतील हरतऱ्हेच्या विषयांसंबंधीं जीं पुस्तकें व जे लेख वाचले असतील ते सोडून दिले तरी शेक्सपिअर, गोल्डस्मिथ, जॉन्सन, ॲडिसन, बर्क, रस्किन, कार्लाइल, गटे, लेसिंग, इत्यादि जुने तसेच अलीकडचे बिरेल, शॉ, गॅल्सवर्दी, गार्विन, ब्रॅडले, वगैरे पाश्चात्य लेखक त्यांनीं इतके वाचले आहेत कीं त्यांची यादी सहज छापील पांच दहा पानें होतील इतकी लांबेल. मराठींतील बरेच जुने कवि, आधुनिक मराठींतील बहुतेक सर्व गद्य लेखक व बरेचसे कवि यांचा त्यांना चांगला परिचय आहे. संस्कृतमधील बहुतेक प्रसिद्ध नाटकें व साहित्यशास्त्रावरील बरेचसे ग्रंथ हीं त्यांनीं अभ्यासिलीं आहेत. आणि तीनहि भाषांतील हे ग्रंथ मार्मिकपणें आणि रसास्वादाच्या दृष्टीनें वाचलेले आहेत, केवळ परीक्षेकरितां किंवा विद्वत्प्रदर्शनाकरितां नव्हे.

त्यांच्या रसिकत्वाच्या जोडीला त्यांचा स्वभावजन्य समतोलपणा आणि त्यांची सविवेकता हे गुण त्यांना लाभले आहेत. शिवाय केसरीचे संपादक व राजकीय पुढाऱ्यांपैकीं एक या नात्यानें त्यांचा अनेक व अनेकविध लोकांशीं अनेक प्रकारचा संबंध येऊन लोकांना काय पाहिजे असतें, लोकांना काय आवडतें, कां आवडतें,

वगैरे त्यांना समजलेलें आहे व लोकाभिरुचि कशी आहे याबद्दलचें त्यांचें मत अधिकारयुक्त समजलें पाहिजे. जागजागचे नवे व जुने वक्ते, लेखक, कवि, कीर्तनकार, शास्त्री, प्रोफेसर, इतिहाससंशोधक, चित्रकार, मूर्तिकार, गवई, बजवय्ये, वगैरे कलाविलासी किंवा शास्त्रचिकित्सक लोक त्यांना भेटत असल्यामुळें या लोकांचीं ध्येयें, त्यांच्या आवडी–निवडी, त्यांचे गुणदोष वगैरे गोष्टी त्यांना जितक्या प्रमाणांत स्वानुभवानें ठाऊक आहेत तितक्या प्रमाणांत फारच थोड्यांना ठाऊक असणार. अर्थात् वाङ्मयकलेविषयीं व शास्त्राविषयीं नवे व जुने विचार व मनोभाव, तसेंच नवी व जुनी कृति, यांच्या नाडया पाहून योग्य चिकित्सा व मीमांसा करण्यास यांना फारच मोठा अधिकार प्राप्त झाला आहे.

केळकरांनीं केवळ वाङ्मयात्मक कलाकृतीच निर्माण केल्या असत्या किंवा बहिर्मुख दृष्टीनें लोकांच्या कलाकृतीचें परीक्षण–समीक्षण केलें असतें, किंवा केवळ रसास्वादांत ते रममाण झाले असते, तर त्यांच्या वाङमयविषयक मीमांसेला आजचें असामान्य महत्त्व आलें नसतें. लेखाच्या प्रारंभींच दिग्दर्शित केल्याप्रमाणें आपण जें करतों तें कसें व कां करतों, आपली जी कलाकृति आहे तिचें सामान्य स्वरूप काय, तिचें ध्येय काय, तिच्यापासून आनंद कां होतो, वगैरे गोष्टींचें अंतर्निरीक्षण करण्याचें सामर्थ्य केळकरांमध्यें असल्यामुळें वरील अधिकारांत आणखी भर पडली आहे. अंतर्निरीक्षणाची कला जितकी सोपी वाटते तितकी नाहीं. पर-हृदयापेक्षां स्वहृदय जाणणें सोपें आहे असें वाटतें, पण तें वाटतें तेवढें सोपें नाहीं. कविजन परकाया-प्रवेश करतात, व सज्जन लोक पर-हृदय जाणतात, पण स्वहृदय-प्रवेश करण्यास जी अंतर्मुख-प्रवृत्ति लागते व जी विवेचक दृष्टि लागते ती प्रत्येकांतच असते असें नाहीं. अध्यात्म-तत्त्व जाणण्याकरितां "**आत्मा वै श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः**" असें म्हटलें आहे तें 'आत्मज्ञान' सोपें म्हणून नव्हे, तर कठीण असून खऱ्या ज्ञानाला आवश्यक म्हणून. याच न्यायानें वाङ्मयाच्या क्षेत्रांत देखील काव्याचा वगैरे आत्मा '**श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः**" असें म्हटलें पाहिजे, आणि या वचनानुसार श्रवण–मनन–निदिध्यासाची ज्याला आवड व शक्ति असेल त्यालाच हा वाङ्मयात्मक आत्मा ज्ञात व लभ्य होईल. केळकरांच्यामध्यें ही आवड आणि ही शक्ति आहे. त्यांनीं वाङ्मयसागरावरून अनेक ठिकाणाहून उड्डाण केलें आहे व वाङ्मयसागरांत ते अनेक

ठिकाणीं डुंबलेले व रममाण झालेले आहेत, इतकेंच नव्हे तर वाङ्मयसागराच्या बुडाशीं जाऊन आणि तेथें डोळे उघडून पाहून ते तळ घेऊन आलेले आहेत !

त्यांची वाङ्मयचिकित्सा वाचनीय होण्याचें आणखी एक कारण असें कीं, त्यांची वाणी रसाळ आहे. साहित्यशास्त्रांतला कसलाहि रूक्ष विषय असो किंवा सूक्ष्म भेद असो, त्याचें पृथक्करण व विवेचन करतांना ते इतके रंगतात व सांगायचें तें इतकें खुलवून सांगतात कीं, तें ऐकतांना किंवा वाचतांना मनुष्य रंगून जातो आणि एका विशिष्ट कलात्मक आनंदांत तो डोलूं लागतो. शुभ्र प्रकाशकिरणाचें पृथक्करण केलें असता सूक्ष्मतम पण रूक्ष तत्त्व हातीं न येतां सात रंग दिसूं लागतात ते त्या किरणाच्या स्वभावगुणामुळें; पण केळकरांनीं सूक्ष्म तत्त्वांचें पृथक्करण केलें असतां तेथें सप्तरंगात्मक जी शोभा दिसते ती मात्र यांच्या कलाकुशलतेमुळें होय !

सौंदर्याचें पृथक्करण व विच्छेदन ( Dissection ) करूं नये, कारण विच्छेदन म्हणजे विध्वंसन ( We murder to dissect ) असें वर्ड्स्वर्थ म्हणतो, आणि फुलांच्या पाकळ्या तोडून टाकणाऱ्या मुलासारखी वृत्ति असलेल्या लोकांच्या बाबतींत हें खरेंहि आहे. पण केळकरांसारख्यांचें विच्छेदन हें देवांचे शस्त्रवैद्य अश्विनीकुमार यांच्या विच्छेदनासारखें असून त्यामुळे विध्वंसन होत नाहीं तर मृतकल्प झालेल्या व शब्दांत मात्र जिवंत राहिलेल्या शास्त्रीय तत्त्वदेहास जणूं कांहीं संजीवनीमंत्रयुक्त हस्तस्पर्शाचा लाभ होऊन त्यांत जीवनकला उत्पन्न होते व तें नाचूंबागडूं लागतें आणि आपलें मन आकर्षण करून घेतें. उदाहरणार्थ, काव्यादिकांचा आस्वाद न घेतां त्यांची चर्चा करणें वेडेपणाचें आहे या आक्षेपाबद्दलच त्यांनीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, फलाहार करतांना द्राक्षादि फलांचा वगैरे आहार हा जरी प्रमुख हेतु असला तरी त्यावेळीं हीं फळें कोठून आलीं, त्यांचे प्रकार किती, प्रत्येकाची चव काय, वगैरे गोष्टींबद्दल चर्चा केली असतां फलाहारांत अधिक मौज उत्पन्न होणार नाहीं काय ? काव्यानंदाचा उपभोग न घेतां शुष्क वाटणाऱ्या काव्यचर्चेबद्दल जो आक्षेप घेण्यांत आला त्याची धार या अशा उपमांमुळें लगेच बोथट होते. उपमांनीं अर्थात् सगळें काम होत नाहीं. चांगल्या उपमा या हंड्याझुंबरांतील मेणबत्त्यांप्रमाणें लेखनमन्दिर प्रकाशित करतात किंवा सुवासिक पुष्पांप्रमाणें तें सुगन्धयुक्त करतात किंवा सनईच्या सुरांप्रमाणें गूढ आणि कोमल भावना जागृत करतात आणि श्रोत्यांचीं मनें प्रसन्न

व प्रफुल्लित करतात. पण कीर्तनाचें मुख्य काम विद्वान् हरदासालाच केलें पाहिजे. उदाहरणार्थ, केळकरांची वरील उपमाच घ्या. साहित्यचर्चा म्हणजे फलाहाराच्या वेळच्या शिळोप्याच्या गप्पा नव्हेत, तर तद्विषयक एक मोठें महत्त्वाचें शास्त्र आहे, ती एक कलाहि आहे; इतकी कीं कलाकृति जशी व जितकी सुंदर असते तितकी कलाविषयक टीकाहि असूं शकते, हा अत्यंत महत्त्वाचा मुद्दा वरील उपमेंत सूचित होत नसला तरी पण काव्यचर्चेवरचा पूर्वनिर्दिष्ट आक्षेप वाचून किंवा ऐकून मनांत जो प्रतिकूल ग्रह उत्पन्न झालेला असतो त्याची तीव्रता केळकरांनीं दिलेल्या वरच्यासारख्या उपमांनीं कमी होत नाहीं काय ? अर्थात् होतेच. तात्पर्य, तर्कावर अधिष्ठित असलेली केळकरांची वाङ्मयविषयक चर्चा विद्वत्त्व, विवेकित्व, विनोदित्व इत्यादि बहुमोल आंतर सद्गुणांनीं युक्त असल्यामुळें व उपमादि अलंकारांनीं सुशोभित असल्यामुळें ती मधुर कलाकृतीप्रमाणें रसिकांस आदरणीय व सेवनीय वाटते यांत नवल नाहीं.

असो. एवढी प्रस्तावना करून केळकरांच्या वाङ्मयविषयक चर्चेतील एकेका विषयाकडे आतां मी वळतों.

वाङ्मयाचा पृथक्करणात्मक विचार करूं लागल्यावर गद्य व काव्य हा भेद प्रथम ध्यानांत येतो. केळकरांनीं उज्जयिनी येथें नुकतेंच जें भाषण केलें त्यांत या प्रकारांचा भेद दर्शविण्याचा चांगला प्रयत्न केलेला आहे. “ माझें लेखन मुख्यतः विवेचनात्मक व तर्कनिष्ठ असतें असें मला वाटतें. म्हणून मी गद्य-लेखक या सदरांतच पडेन ” असें म्हणून विवेचन व तर्कनिष्ठता हे गद्याचे व्यवच्छेदक विशेष होत हें त्यांनीं सुचविलें आहे तें बरोबर आहे. गद्य व काव्य हा भेद वृत्तबद्धतेचा अभाव किंवा अस्तित्व या बाह्यलक्षणावर अवलंबून नसून लेखनाच्या परिणामावर अवलंबून आहे हें ते जाणून आहेत. ते सदर व्याख्यानांतच म्हणतात कीं, “ कित्येक लेखक गद्यच इतकें सरस लिहितात व कित्येक लेखक पद्यच इतकें नीरस लिहितात कीं संसारांत अनेक वेळां अनुभवाला येतें त्याप्रमाणें दादाला अक्का व अक्काला दादा म्हटलें तर तें शोभेलहि.” पण जनरूढीला अनुसरून आणि ‘ **प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति** ’ या न्यायानें ते जुने शब्द ठेवण्यास तयार आहेत. पद्य व काव्य यांमध्यें भेद आहे तो दाखवून काव्याचें काव्यत्व भावना-प्रवर्तनामध्यें आहे हें त्यांनीं पुढील उदाहरणानें स्पष्ट केलें आहे. “ बाणभट्टाची कादंबरी गद्यरूप असली तरी तें काव्यच

होय व राजतरंगिणी पद्यमय असली तरी तें गद्यच होय. इंग्रजींतहि कार्लाइल व इमर्सन यांचे लेख गद्यरूप असले तरी तें काव्यच होय व वर्ड्स्वर्थ यांची कविता पद्यरूप असली तरी तें गद्यच होय." माझ्या मतें गद्य-पद्यांची बाह्यलक्षणावलंबी भाषा सोडून द्यावी. **बोधप्रधान व रसप्रधान** असे दोन प्रकार मानावेत व 'गद्य' आणि 'काव्य' असा भेद न करितां 'शास्त्रीय वाङ्मय' आणि 'विदग्ध वाङ्मय' असा भेद करावा. पण केळकर म्हणतात त्याप्रमाणें "शब्दसंकेत हा दुस्तर आहे व तो पाळलाच पाहिजे!"

खऱ्या काव्याला छंद, यमकें, अलंकार, वगैरेंची आवश्यकता नाहीं हें केळकर तत्त्वतः कबूल करतात. पण लगेच मागच्या दरवाजानें या सर्वांना ते आवश्यक अंगांच्या योग्यतेला नेऊन बसवितात. उदाहरणार्थ, "रस हा काव्याचा आत्मा असेल" असें अर्धवट कबूल करून लगेच ते "अलंकृत भाषा हा त्या रसरूपी आत्म्याचा निदान देह होय" असें मानण्यास ते आपणांस सांगतात. दुसऱ्या एका ठिकाणीं ते म्हणतात, "अलंकार, वक्रोक्ति, व्यंग्योक्ति, हाहि काव्याचा आत्मा नव्हे असें म्हणणारे लोक संकुचित दृष्टीचे आहेत." "रसोत्कर्ष होण्याला स्वभावोक्ति पुरी पडूं शकेल, पण ती नेहमींच पुरी पडते असें नाहीं." यमकें हीं आवश्यक नसतील असें कबूल करून पुनः त्यांच्या गौरवार्थ ते म्हणतात कीं, "यमकानें नुसता शब्दच नव्हे तर कल्पनाहि सुचतात." त्यांचें हें सर्व म्हणणें खरें आहे आणि काव्याकाव्यामध्यें भेद करून तारतम्य ठरवलें म्हणजे पुष्कळसा वाद मिटण्यासारखा आहे. भावनाविलासांप्रमाणें कल्पनाविलासांना व विचारविलासांना गौरवाचें स्थान देण्यास माझी हरकत नाहीं; पण तर-तम-भाव ठरवावयाचा म्हटला म्हणजे भावनाविलासांना उच्चतम स्थान द्यावें लागेल असें मला वाटतें आणि भावनाविलासात्मक उच्चतम काव्यांचा आत्मा अलंकार नव्हे, किंवा वक्रोक्ति नव्हे किंवा व्यंग्योक्तिहि नव्हे हें म्हणणें मान्य करावें लागेल. भावनाविलासात्मक उच्चतम काव्यांचा 'देह' म्हणून देखील अलंकारादिकांना मान्यता देण्यास मी तयार नाहीं. कारण 'देह' म्हणणें म्हणजे ते आवश्यक आहेत असें मान्य करण्यासारखें आहे. तालबद्ध रचना, छंद, अनुप्रास, यमकें, अर्थालंकार, वक्रोक्ति, व्यंग्योक्ति इत्यादीं-मुळें भाषणाला किंवा लेखनाला शोभा येते हें मला कबूल आहे. यांचें पुष्कळ वेळां कवींना बंधन वाटत नाहीं, तर स्वाभाविकपणेंच असले सालंकार व मधुर वाक्प्रबंध

त्याना सुचतात हेंहि कबूल. यमकादिकांचें बंधन असतें म्हणूनच कांहीं वेळां कवींना वगैरे डोकें खाजवावें लागतें, व त्यांच्या कल्पनाविलासाच्या व बुद्धिविलासाच्या सामर्थ्याला चालना मिळते, त्यांची स्वतःची व वाचकादिकांची तद्विषयक हौस पुरवली जाते आणि उभयतांना सात्त्विक काव्यानंदाचा लाभ होतो हें सर्व मला मान्य आहे. काव्य म्हटलें म्हणजे तें भावनाविलासात्मकच पाहिजे असा माझा आग्रह नाहीं; बुद्धिविलास व कल्पनाविलास यांचें मला इतरांप्रमाणेंच कौतुक वाटतें आणि तज्जन्य आनंद लुटतांना मला कमीपणा किंवा लाज वाटत नाहीं. शाब्दिक कोटयांचा देखील मी भोक्ता आहें, मग त्याहून उच्चतर असलेल्या अलंकारादिकांनीं माझें मन प्रफुल्लित होतें हें कबूल करण्याची जरूर नाहीं. कल्पनावैभव, शब्दप्रभुत्व इत्यादिकांनीं उत्पन्न झालेली आश्चर्य-चकितता, कौतुक, इत्यादींनीं विशिष्ट अशी एक संमिश्र भावना असते व भावना ही सात्त्विक आणि उच्च स्वरूपाची असूं शकते असें केळकरांनीं जें मार्मिकपणें दाखविलें आहे तें सर्व यथार्थ आहे. कोणत्याहि बौद्धिक व्यापाराशेजारीं तद्विशिष्ट भावना नियमानें असतेच हें मानसशास्त्रीय तत्त्व या संदर्भांत ध्यानांत धरावें. सर्वच काव्यें भावनाविलासात्मक असतात असें या अर्थानें म्हणतां येईल; पण अशांचें प्राधान्य पाहून नांवें ठरविलीं तर सामान्यतः ज्यांना भावनाविलासात्मक काव्यें म्हणतात त्यातील उच्चतम काव्यांना यमकें, अलंकार, इत्यादींची आवश्यकता नाहीं, तीं अंगभूत नाहींत, तर अनुषंगानें, गौणरीतीनें व अनियमपूर्वक येणारीं आहेत असें मला म्हणावयाचें आहे. अलंकारादिकांच्या विरुद्ध लिहिणारे लॉक ( Locke ) प्रभृति लोक देखील अलंकारांचा उपयोग करतात असें केळकर म्हणतात. यावरून एवढेंच सिद्ध होईल कीं, त्यांचा उपयोग करणें मनुष्यमात्रास आवडतें,—त्यांची योग्यता उच्चतम आहे हें असल्या उदाहरणांनीं सिद्ध होत नाहीं, किंवा उच्चतम वाङ्मयाला तीं आवश्यक असतात हेंहि सिद्ध होत नाहीं. शुद्ध व उच्चतम विनोद शब्दनिष्ठ किंवा कल्पनाविलासात्मक नसतो किंवा बुद्धिविलासात्मक नसतो, तर तो प्रसंगनिष्ठ असतो असें अलीकडे म्हणूं लागले आहेत तेंच शोक-शृंगार वगैरे रसांसंबंधानेंहि म्हणतां येईल. हिंगणें येथील शाळेंतील एका आठ दहा वर्षांच्या मुलीला कुंकू न लावतां फिरल्याबद्दल मीं रागावूं लागलों असतां " तात्या, मला कुंकूं लावायचं नसतं " असें ती अजाण बालिका जणूं कांहीं आपण म्हणतों त्यांत कांहींच नाहीं अशाच भासणाऱ्या स्वरांत

म्हणाली. या वाक्यांत तालबद्धता आहे का नाहीं कुणास ठाऊक, पण यमक, उपमा, उत्प्रेक्षा वगैरे अलंकार नाहींत. तरी माझ्या हृदयांत त्या वेळीं काय झालें तें माझें मला ठाऊक ! हा प्रसंग खरा घडलेला, पण असला प्रसंग काव्यांत, कादंबऱ्यांत वगैरे कवीनें वर्णिलेला वाचला तर भावनात्मक उच्चतम शोकरस उत्पन्न होईल. या काव्यांत 'अंगभूत' असा कोणताहि अलंकार नसला तरी चालेल; किंबहुना अलंकारांनीं कदाचित् रसहानि होईल !

विशिष्ट प्रसंगाचें वर्णन करून त्यावेळीं वापरलेले अलंकाररहित साधे शब्द देखील रसोत्पत्ति करूं शकतात याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. मृच्छकटिकांतील शकार आपण खून करण्याचा प्रयत्न करून सवरून न्यायसभेंत नुसतें 'मी नाहीं केला' ( न मया ) असें म्हणतो ते शब्द; किंवा आथेल्लो शेवटच्या अंकांत दुष्ट इॲगोला जेव्हां तलवारीनें वार करतो तेव्हां इॲगो "I bleed, Sir; but not killed" ("मला जखम झाली आहे, पण प्राण वांचला आहे.") असें शांतपणें व निर्लज्जपणें बोलतो ते शब्द; किंवा उत्तररामचरितांतील सीतेनें रामाविषयीं आदरपूर्वक उद्गारलेले "म्हणूनच हे रघुकुलाला भूषणभूत आहेत" अशा भावार्थाचे शब्द; किंवा रामानें आपल्या परिचारकाला "मला पूर्वीप्रमाणेंच रामभद्रच म्हणत जा" अशा आशयाचे सांगितलेले शब्द—यांत छंद नाहीं, यमक नाहीं, अलंकार नाहीं, कल्पनाविलास नाहीं, बुद्धिविलास नाहीं—असें असतां तो तो रस उत्कटतेनें उत्पन्न होतो. कित्येक वेळां तर कवी हे प्रसंगाचा असा बनाव जुळवून आणतात कीं, तेथें विशिष्ट पात्र तुटक तुटक चांचरत बोलतें त्यांतच रस भरलेला असतो. आथेल्लोमधील (Cāssio) दारूच्या निशेंत 'हा माझा डावा हात आणि हा माझा उजवा हात' असें अडखळत बोलतो तें, किंवा हॅम्लेटमधील ऑफिलिआ ही वेड लागल्यावर कांहींतरी बोलते तें, वाचकांना येथें आठवेल. "ब्रह्म म्हणजे काय ?" असें विचारल्यावर ब्रह्म हें अनिर्वचनीय आहे हें स्वानुभवानें जाणणाऱ्या गुरूनें जें मौन स्वीकारलें तें देखील "**गुरोस्तु मौनं व्याख्यानम्**" अशा तऱ्हेचें झालें ! किंवा ब्रह्मविषयक गहन गोष्टी सोडून व्यावहारिक गोष्टीविषयीं बोलावयाचें म्हणजे एखाद्या निष्कपटी विद्यार्थिनीनें भाबडेपणानें भलताच प्रश्न विचारला असतां गुरु जें मौन स्वीकारतो तेंहि 'गुरोस्तु मौनं व्याख्यानम्" अशा तऱ्हेचें असतें. अशा प्रकारच्या मौनात्मक व्याख्यानांतहि

' ध्वनि ' असतो आणि तो रसोत्पादक असतो यांत शंका नाहीं.

तात्पर्य, कवींनीं, नाटककारांनीं, कादंबरीकारांनीं वगैरे असे प्रसंग वर्णिले आहेत कीं तेथें साध्या शब्दांनीं देखील उच्चतम रसोत्पत्ति झाली आहे. यापुढें जाऊन असेंहि म्हणतां येईल कीं, त्या प्रसंगीं अलंकारिक भाषा कोणीं वापरली आहे अशी कल्पना केली तर तेथें रसहानि झाली असती !

अलंकारादिकांची काव्याला आवश्यकता नाहीं असें केळकर कबूल करतात, पण त्यांचा स्वाभाविकपणेंच सालंकार वैदग्ध्याकडे व लालित्याकडे कल असल्यामुळें ते त्यांना जें महत्त्व देतात तें मला पसंत नाहीं. ( हें फाजील महत्त्व देण्याचें एक कारण असें दिसतें कीं, रस व अलंकार यांत तत्त्वतः ते भेद मानीत नाहींत,—अलंकार हा रसाचाच जणूं कांहीं प्रकार आहे असें ते मानतात. " रस व अलंकार यांच्या स्वरूपांत वास्तविक इतकाच फरक कीं, रसाचे स्थायिभाव जीवसृष्टीच्या भावनावर अधिष्ठित असतात व अलंकाराचे स्थायिभाव अचेतन सृष्टीवरहि अधिष्ठित होऊं शकतात. " ) असो. अधिक विस्तार नको. खरें म्हटलें म्हणजे वर निर्दिष्ट केलेल्या प्रसंगांसारखे प्रसंग वर्णन करून स्वाभाविक रसोत्पत्ति करण्याकडे लेखकांची अधिकाधिक प्रवृत्ति व्हावी म्हणूनच या मुद्द्याचा एवढा तरी प्रपंच केला, बाकी तत्त्वतः आमचा मतविरोध आहे असें मुळींच नाहीं.

काव्यानंदाला कारणीभूत वाग्विलास असतो, मग हा विलास प्रधानत्वें करून भावनारम्यत्वमूलक, कल्पनावैभवमूलक किंवा बुद्धिवैभवमूलक असो. वाग्विलास हा अलंकारांच्या काय व रसांच्या काय मुळाशीं असतो. या दृष्टीनें रसाचें व अलंकाराचें मी एकरूपत्व मानूं शकेन. तसेंच भावनांचा, कल्पनांचा व बुद्धीचा परस्परांशीं अत्यन्त निकट संबंध असतो, इतका कीं तीं एकमेकांच्या अंगभूत आहेत, या अर्थानेंहि मी रसाचें व अलंकाराचें एकरूपत्व मानूं शकेन. पण सामान्य दृष्टीनें पाहतां रस व अलंकार यांमध्यें जो भेद मानिलेला आहे तो महत्त्वाचा आहे व त्याकडे दुर्लक्ष करणें युक्त नव्हे म्हणून आणि काव्यादि वाङ्मयप्रबंध ऐतिहासिक, आधिभौतिक ज्ञान देण्याकरितां किंवा नैतिक उपदेश करण्याकरितां नसतात हें केळकरांनीं अनेक ठिकाणीं अनेक तऱ्हांनीं सांगितलें आहे तें ध्यानांत धरण्यासारखें आहे. कीर्ति, अर्थप्राप्ति, सदुपदेश हे हेतु गौण व आनुषंगिक होत, ते प्रधान नव्हेत हें ध्यानांत न धरल्यामुळें कित्येक वेळां कवीचा इष्ट हेतु जो काव्यानंद देणें

तो बाजूला राहून टीकाकार अप्रस्तुत गोष्टींबद्दल उगाच वाद घालीत बसतात. आतां नीतिदृष्टीची आणि काव्यदृष्टीची अगदीं फारकत आहे कीं काय, म्हणजे कवि, चित्रकार वगैरेंनीं नीति–अनीतीचा विचार न करतां केवळ कलाविलास म्हणून पाहिजे ते वाग्विलास किंवा चित्रात्मक विलास करावेत काय हा मुद्दा विचार करण्यासारखा आहे. पण तत्पूर्वीं केळकरांनीं या विषयीं जें सुंदर विवेचन केलें आहे तें त्यांच्या बडोदें येथील व्याख्यानांतून लहान उतारा घेऊन सांगतों.

" कलाविलासाच्या मागें हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहींत. वाङ्मयाला नैतिक प्रबंध म्हणणें आणि साखरभाताला नुसत्या साखरेचा केलेला भात म्हणणें हीं दोनहि सारख्याच समंजसपणाचीं होत. शिल्पशास्त्रांत कलेच्या दृष्टीनें निरनिराळे आकार बनविणें यांत प्रतिभाकौशल्य दिसून येतें. पण देवळाचें उंच शिखरच सुंदर कां, तर तें आकाशांत ईश्वर आहे असें उंच बोट करून दाखवितें म्हणून, अथवा तीन तीन कमानींची जोडीच कां शोभते तर तिजवरून त्रिमूर्ति ब्रह्मा-विष्णू-महेश्वराची आठवण होते म्हणून, असें म्हणणें बरोबर होईल काय ? ताजमहालाच्या पांढऱ्या शुभ्र दगडांत जी रंगीबेरंगी कुसर बसविली आहे तिचा नैतिक हेतु शोधून काढणारानें ताजमहाल पाहण्यास जाण्याचे श्रम न घेतलेलेच बरें. चित्रकार पौराणिक किंवा ऐतिहासिक चित्रें रंगवितो तेव्हां त्याचा हेतु कलेच्या दृष्टीनें सुंदर चित्रें रंगविण्याचा असतो कीं नीतिबोध करण्याचा असतो ? पोहावयास पडणारा मनुष्य जलक्रीडा करतो ती स्नानाच्या हेतूनें नव्हे. शिकारी क्षत्रिय अरण्यांत मृगयाविलास करतो ती एक दिवस चांगलें मास खावयाला मिळावें म्हणून करीत नाहीं ! गवई दीप-राग आळवितो तो अर्थशास्त्रदृष्ट्या मशालजीचा खर्च वांचविण्याकरितां नव्हे. तात्पर्य, ' अधिकस्याधिकं फलं ' या न्यायानें, कलेच्या दृष्टीनें वाङ्मय सुंदर असून त्यांतूनच नीतिबोध निघण्यासारखा असल्यास दुधांत साखर पडेल; पण ज्याचा मूळ हेतु नीतिबोध नाहीं तें वाङ्मयच नव्हे हें म्हणणें यथार्थ नाहीं,........... शुद्ध निरपेक्ष आनंद हाच कलेचा हेतु व तेंच फळ होय. "

शेवटल्या वाक्यांतील ' आनंद ' या शब्दामागें ' शुद्ध ' हें विशेषण लावलेलें आहे तें फार महत्त्वाचें आहे. कला ही नीतीची दासी नसेल, कलेनें आत्मप्रसादाकरितां स्वतःच्या मनाला ' पूत ' वाटेल तें करावें व नीतीची फाजील प्रतिष्ठा ठेवूं

काय ? असें जर नसेल तर कलावंतांवरच कां एवढा रोख ? कलावन्तानें खरोखर सामान्यतः आपल्या कलेच्या ध्येयापेक्षां व नियमापेक्षां दुसरी-तिसरीकडे पाहूं नये. कलात्मक आनंद देणें-घेणें हेंच त्याचें ध्येय असावें आणि कलाविषयक जे नियम त्यांचीं त्यानें नियमनें मानावींत. नीति, बोध, समाजहित, वगैरेंकडे सामान्यतः त्यानें लक्षच देऊं नये. असामान्य परिस्थितींत मात्र या तत्त्वाला मुरड घातली पाहिजे. पण अशी परिस्थिती अपवादात्मक असणार. कलावन्तानें कला हीच देवता मानावी आणि तिची अनन्यभक्ति करावी, हें प्राध्यापक फडके यांचें मत मला मान्य आहे, पण 'सामान्यतः' हा शब्द मी त्या वाक्यांत घालूं इच्छितों हेंहि लगेच सांगतों. कला ही समाजहितोन्मुख असली तर उत्तमच, पण प्रत्येक कलावन्तानें प्रत्येक वेळीं समाजहिताकडे नजर लावून आपल्या कलेचा विलास करावा हें म्हणणें दुराग्रहाचें आहे. इतकेंच नव्हे तर घातुक आहे. आधीं हें 'समाजहित' ठरवावयाचें कोणी ? हें समाजहित साध्य कसें करावयाचें हेंहि ठरवावयाचें कोणी ?

हल्लींच्या स्वातंत्र्यवादाच्या युगांत लेनिन-स्टॅलिन-गांधी-नेहरु यांच्यासारख्या लोकहितपर व्यक्तींनींहि जरी म्हटलें कीं अमुक कलावन्तानें अमुक प्रकारची कला-निर्मिती करावी तर माझ्यासारख्यांना तरी तत्त्वदृष्टया पटणार नाहीं. एक तर असल्या व्यक्ति अलौकिक असल्या तरी त्याहि स्खलनशील असतात, आणि त्यांच्या हातीं आपली शेंडी, म्हणजे आपलें कलास्वातंत्र्य, देणें स्वातंत्र्यप्रिय व्यक्तीला समर्थक प्रबल कारण दाखविल्याशिवाय योग्य वाटणार नाहीं. दुसरें असें कीं या व्यक्ति कितीहि चांगल्या असल्या तरी सर्वाधिकार चालविण्याची संधि वारंवार दिली गेल्यास त्यांना ती संवय किंवा चटकच लागते आणि लोकहिताच्या दृष्टीनें तें योग्य नव्हे. तिसरें असें कीं अमुक एक प्रकारची व ध्येयाची कलानिर्मिति पाहिजे अशा नियंत्रणाचा कलावन्ताच्या स्वैरविकासाला व विहाराला बाधच होतो, आणि त्याच्या कलेला कमी-अधिक प्रमाणांत वैगुण्य येतें. चवथें असें कीं पर-प्रेरित आणि पर-नियंत्रित नीतिमत्ता जशी खरी नीतिमत्ता नव्हे, त्याचप्रमाणें पर-प्रेरित व पर-नियंत्रित कला बाह्यतः कितीहि चांगली दिसली तरी खरी कलाच नव्हे. कला काय, नीति काय किंवा सत्यप्रीति काय, पूर्ण स्वातंत्र्याच्या मोकळ्या हवेंतच फोफावते, फुलते आणि सुफलदायी होते. सामान्यतः जिचा तिचा

स्वधर्म तिला मोक्षदायक; परधर्म हा केव्हांहि अधःपाताला कारणीभूत. मग तो नीतीचा असो, किंवा सत्यदेवतेचा असो.

प्राध्यापक फडके यांचेंहि असेंच मत आहे, पण वर दिग्दर्शित केल्याप्रमाणें एकाच अंतरात्म्यांत कला-नीति वगैरेंना नांदावयाचें असल्यामुळें, विशिष्ट मर्यादे-नंतर एकमेकींचीं क्षेत्रें इतरांच्या क्षेत्रांतून जात असल्यामुळें, आणि शिवाय तत्त्वतः त्यांच्यामध्यें अन्योन्याश्रय असल्यामुळें अपवादात्मक प्रसंगी एकमेकींची सोय एकमेकींनीं पाहावी एवढेंच माझें म्हणणें. दुसरें असें कीं कला हा एक क्रीडेचा प्रकार; नीति ही मोलकरीण व कला ही मालकीण; वाङ्मयात्मक कलाकृतींनीं समाजाच्या सुधारणेला फारशी मदत केलेली नाहीं, वगैरे विधानें मला अतिशयोक्त वाटतात. भाई डांगे, फडके, देशपांडे, पेंडसे वगैरेंचीं मतेंहि कांहीं अंशीं मला मान्य आहेत व कांहीं अंशीं अमान्य आहेत. हीं अशीं अर्धवट मान्य—अमान्य मतें हल्लींच्या एकान्तिकतेच्या युगांत सामान्यतः आकर्षक वाटत नाहींत हें ठाऊक असून देखील उज्जयिनीकर महाराष्ट्रीयांपुढें मांडण्याचें धारिष्ट केलें हें केवळ आपल्या सौजन्यावर भिस्त ठेवूं शकतों म्हणून. माझ्या वरील विवेचनांत कोणाच्या मतांचा विपर्यास झाला असल्यास तो अजाणतां झाला आहे; तो माझ्या नजरेस कोणी आणून दिल्यास त्याचा मी ऋणी होईन

# वाङ्मयकलाविषयक माझी दृष्टि

प्रो. फडके यांनीं साहित्याचे दोन प्रकार मानिले आहेत. एक शिकविणारें साहित्य आणि दुसरें रिझविणारें साहित्य. शिकविणारें साहित्य रिझविणारें होऊं शकेल. उदाहरणार्थ मेकॉलेचे निबंध, विष्णुशास्त्री चिपळूणकरांची निबंधमाला, शिवरामपंत परांजपे यांचे कांहीं निबंध इत्यादि. त्याचप्रमाणें रिझविणाऱ्या साहित्याला शिकविण्याचें वावडें नाहीं, त्यानें शिकविलें तर तें पाप आहे असें प्रो. फडके कधींहि म्हणाले नव्हते आणि म्हणत नाहींत. 'कलेकरितां कला' असें ज्यावेळीं ते म्हणतात त्यावेळीं त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ एवढाच असतो कीं कलावन्तानें कलाकृति करतांना आपल्या कलेचे नियम आपण पाळतों किंवा नाहीं आणि आपली कृति सुंदर होते किंवा नाहीं याकडे मुख्यतः लक्ष द्यावें. आणि यांत गैर काय आहे ? साधीं घरगुतीं उदाहरणें घेऊन बोलावयाचें म्हणजे टेनिस खेळणाऱ्यानें टेनिसचे नियम सांभाळून डाव कसा जिंकतां येईल इकडे लक्ष द्यावें. प्रतिपक्षाचा पराभव झाला तर त्याला वाईट वाटेल कीं काय, त्याला हूल दाखवून चेंडू दुसरीकडे मारणें हें पाप आहे कीं काय, असल्या गोष्टींचा विचार करूं नये हें म्हणणें सरळ आहे. जेवतांना अन्न स्वच्छ, रुचकर, पचण्यासारखें आणि बलवर्धक आहे कीं नाहीं तें पाहावें, इतर गोष्टींचा फारसा विचार करूं नये, यांत गैर असें फारसें कांहीं नाहीं. तसेंच कलावन्तानेंहि आपल्या कलेच्या दृष्टीनें विचार करावा इतर असंबद्ध विचारांच्या भोवऱ्यांत सांपडूं नये, हें प्रो. फडक्यांचें म्हणणें हिशेबी आहे. गुलाबाचें चित्र पाहिल्यावर त्यापासून कांहीं बोध मिळत नाहीं अशी कोणी तक्रार करतो काय ? बरें एखाद्या सापाचें, वाघाचें किंवा गाढवाचें हुबेहुब चित्र काढलें तर त्यावरहि कोणी आक्षेप घेत नाहीं. एखाद्या नग्न स्त्रीचें चित्र काढलें तर मात्र

वादाचें वादळ उठतें. साहित्यामध्यें देखील असेंच आहे. एखाद्या गद्यलेखकानें किंवा कवीनें वनश्रीचें किंवा राजवाड्याचें किंवा एखाद्या गरीबाच्या झोंपडीचें चांगलें चटकदार वर्णन केलें तर त्यावेळीं कोणी असा प्रश्न काढीत नाहीं कीं या वर्णनापासून काय बोध घ्यायचा ? पण रूढ कल्पनांना, नीतिनियमांना, चाली-रीतींना धक्का देणारें वर्णन कितीहि चांगलें असलें कीं, किंबहुना चांगलें असतें म्हणूनच-वाद निघतो कीं असलें लिखाण योग्य कीं अयोग्य ?

या विषयासंबंधीं माझें मत दहापंधरा मिनिटांत सांगायचें आहे म्हणून मी असें म्हणेन कीं ' कलेकरितां कला ' हें प्रमेय मला सामान्यतः मान्य आहे. ' सामान्यतः ' या शब्दावर मी जोर देत आहें. कारण मी या प्रमेयाला कांहीं अपवादात्मक परिस्थितींत थोडीशी मर्यादा आणि मुरड घालूं इच्छितो. मघाशीं आपण खेळण्याचें एक उदाहरण घेतलें. खेळतांना प्रतिपक्षाला हूल देऊन फसविण्यांत कांहीं पाप नाहीं हें खरें आहे, त्याचप्रमाणें त्याचा पराभव झाला असतां त्याला जें दुःख होईल तिकडे पाहावयाचें नसतें हेंहि खरें आहे, पण त्याचा जीव जाईल किंवा त्याला मोठी दुखापत होईल अशा रीतीनें खेळ खेळणेंहि उचित नाहीं असें आपण मानतोंच ना ? क्रिकेट खेळतांना अंगाला दुखापत होईल अशा प्रकारचें आततायीपणाचें ' अंग-झोडपें ' म्हणजे ( Bodyline ) बोलिंग बरेच लोक अशिष्टपणाचें समजतात तें उगाच नाहीं. कलेचा खेळ खेळतांना " तुमचा खेळ होतो पण आमचा जीव जातो " असें गोष्टींतल्या बेडकांप्रमाणें म्हणण्याची पाळी जनतेवर येऊं नये इतकी काळजी कलाक्रीडा करणाऱ्यांनीं घ्यावी असें मला वाटतें.

साहित्यकलेला स्वातंत्र्य असावें, तिला पायबंद कोणी घालूं नये, आनंद देणें हेंच तिचें अवतारकृत्य आणि तेंच तिचें सौभाग्य, आपल्या मंदिरांत तरी तिला राणीचा मान पाहिजे, जराजर्जर रूढीचा, निर्दय नीतीचा किंवा कल्पनाशून्य सत्य-प्रीतीचा तिला सासुरवास नसावा, या आणि अशा सर्व गोष्टी मला मान्य आहेत. पण कलेचा आणि साहित्यकलेचा मी भक्त असलों, तरी मी अनन्य भक्त नाहीं. मला केव्हांहि हें विसरतां येत नाहीं कीं मनुष्याचा जन्म केवळ कलेचा आनंद लुटण्याकरितां नाहीं. कला नसेल तर मनुष्याच्या जीवनांत तें मोठेंच वैगुण्य होईल, पण जीवन हें केवळ कलामय नाहीं. जीवनांत ज्या अत्यंत रम्य आणि वंद्य गोष्टी आहेत त्यांत कलेबरोबर नीतीचा आणि सत्याचाहि समावेश होतो आणि यांचें जर

एकमेकांत पटलें नाहीं तर जीवनांतली ती मोठीच आपत्ति म्हटली पाहिजे. जीवनांत कला नसेल तर तें बेचव, नीरस, कळाहीन होईल हें खरें, पण सत्य नसेल तर तें लुलें, आंधळें, पांगळें होईल, आणि नीति नसेल तर तें रोगट, कुजकें, नासकें होईल. अर्थात् या तिहींपैकीं कोणाचेंहि अनिर्बंध असें स्तोम माजविण्यांत आणि कोणालाहि शेफारूं देण्यांत अर्थ नाहीं. कलेला काय, नीतीला काय किंवा सत्याला काय, आपापल्या क्षेत्रांत सामान्यतः स्वातंत्र्य असावें. हें एक ध्यानांत धरावें कीं कलेचा कलह पुष्कळ वेळां होतो तो खऱ्या नीतीशीं किंवा उच्चतम सत्याशीं नसतोच मुळीं. पुष्कळ वेळां मी असें पाहिलें आहे कीं नीतीचा आणि सत्याचा मक्ता जणूं कांहीं आपल्याकडेच आहे असें समजणाऱ्या आकुंचित बुद्धीच्या भक्तगणांनीं नसता कलह उत्पन्न करून उगाच वावटळ उत्पन्न केलेली असते. कांहीं प्रामाणिक नीतिभक्तांना विनोदबुद्धीच नसते आणि आपल्या उणीवेची त्यांना जाणीव नसल्यामुळें ते नाकानें कांदे सोलून डोळ्यांतून उगाच आसवें गाळतात आणि पावित्र्यविडंबनाची वगैरे कोल्हेकुई उठवून देतात. असल्या विनोदबुद्धिहीन नीतिभक्तांना ताळ्यावर आणण्याकरितां कांहीं एकान्तिक कलात्मक व कलैकपुरस्कारक लोक असणें समाजाच्या दृष्टीनें फार उपयुक्त आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं, कलेच्या दृष्टीनें पाहतां येणें ही गोष्ट सोपी नाहीं. –

हें प्रांजलपणें कबूल केल्यानंतर ' कलेकरितां कला ' या प्रमेयाला मुरड कशी घातली पाहिजे हें थोडक्यांत सांगण्यास हरकत नाहीं. ' कलेकरितां कला ' हें जितकें खरें आहे त्याहून कला हें एक जीवनाचें अंग आहे, तें जीवनसर्वस्व नव्हे, हें अधिक खरें आहे. ' आनंद ' हें कलेचें अवतारकृत्य खरें पण नीतीच्या नरड्याला नख लावून किंवा सत्य पायाखालीं तुडवून कला नाच करूं लागली तर सात्विक आनंद मिळूं शकेल काय ? अर्थात् नाहीं.

आतां मला कोणी असें विचारील कीं " वामनराव, सत्याला किंवा नीतीला दुखविणारें किंवा चिरडणारें कलेचें बेबंद तांडवनृत्य तुम्हांला नको हें वादाकरितां क्षणभर आम्ही कबूल करितों. आतां यापुढें तरी तुम्हांला 'कलेकरितां कला' या प्रमेयाला दुसरी कांहीं मर्यादा किंवा मुरड घालायची नाहीं ना ?" असा मला जर कोणी प्रश्न केला तर मी म्हणेन कीं ' नाहीं '; आणखी कांहीं मुरड बिरड घालायची नाहीं. पण एक मुद्दा मात्र मला स्पष्ट करायचा आहे. तो असा कीं ज्या कलावन्ताला कांहीं एक

सांगावयाचें नाहीं, ज्याच्याजवळ सांगण्यासारखें कांहीं नाहीं, त्याची कला लहान मुलांच्या रबरी फुग्यासारखी दिसण्यात सुंदर, पण अगदीं पोकळ असेल. अशा कलेला विशेष कांहीं किंमत नाहीं. प्रा. फडक्यांच्याच कलात्मक कादंबऱ्या घेतल्या तरी त्यामध्यें प्रा. फडक्यांना संसारांत जीं चमत्कृतिजनक दृश्यें दिसलीं आणि जीं त्यांना इतरांना सांगावींशीं वाटलीं तींच त्यांनीं कलात्मक रीतीनें वर्णिलेलीं आहेत ना ? संसारांतील हीं चमत्कृतिजनक दृश्यें हुडकून काढण्यांत त्यांचा मार्मिकपणा दिसून येतो. हा मार्मिकपणा त्यांच्यामध्यें नसता तर त्यांचीं वर्णनें विशेष आनंददायक झालीं असतीं काय ? वाङ्मयीन कलावन्त जें सांगेल त्यांत जितका खोलपणा, जितका मार्मिकपणा, जितकें अर्थवैभव असेल त्या मानानें त्याची योग्यता कमीअधिक. कर्णमधुर शब्दावडंबर, शुष्क कोटया, क्षणभर चकित करणारे शब्दश्लेष, इत्यादिकांमध्यें जी थोडीबहुत चमत्कृति आहे तिच्यामुळें मनाची क्षणभर करमणूक होते एवढेंच तिचें महत्त्व. डोंबाऱ्याचे खेळ किंवा माकडाच्या उलथ्यासुलथ्या उडया पाहून क्षणभर आपण हंसतों त्यांतलाच तो प्रकार. अशा लोकांची किंमत बेताचीच. शेक्सपियर, टॉमस हार्डी, आपले फडके, इत्यादिकांनीं आपल्या कलाकृतींमध्यें मानवी स्वभावविशेष, मानवी संसारांतील पेंचप्रसंग, मानवी मनामध्यें आंतल्याआंत चाललेले कलह किंवा उलटसुलट प्रवाह, मानवी मनांतील बऱ्यावाईट विचाराची, भावनांची आणि प्रवृत्तींची विलक्षण गुंतागुंत, इत्यादिकांचीं जीं शब्दचित्रें काढिलीं आहेत त्यांवरून ' अशा अशा रीतीनें वागा किंवा वागूं नका ' असें सांगितलें नसेल, पण तीं शब्दचित्रें पाहिल्याबरोबर जें पूर्वी आपणांस दिसलें नव्हतें, किंवा निदान स्पष्टपणें दिसलें नव्हतें, तें आपण आज पाहिलें असें आपणांस वाटतें आणि आपल्या अनुभवात चांगली भर पडली असा प्रत्यय येऊन आनंद होतो ही गोष्ट निर्विवाद आहे. कित्येक वेळां अनुभवांमध्यें भर पडत नाहीं, तर स्वानुभवाचा पुनःप्रत्यय येतो. भर घालून म्हणा किंवा पुनःप्रत्यय आणून देऊन म्हणा, साहित्यिक कलावन्त आपणास ऋणी करतात. हे कलावन्त केवळ शाब्दिक वेलबुट्टीनें आणि रंगीबेरंगी चकाकीनें मन रमवूं म्हणतील, तर क्षणभर मन रमेल कदाचित्; पण लगेच आपण म्हणूं कीं " या कलावंताची बुद्धि कांहीं विशेष खोल किंवा मार्मिक नाहीं. " थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे कला ही उपदेशगर्भ असलीच पाहिजे असें नाहीं, हें त्रिवार सत्य आहे. कलाकृतीमध्यें कलेचे नियम संभाळले

पाहिजेतच आणि हे नियम संभाळून कलात्मक आनंद देणें हेंच त्याचें खरें कार्य. पण कलाकृतींत कलावन्ताच्या मनाची खोली, प्रगल्भता, विवेकशीलता, मार्मिकता, ज्या मानानें दिसेल त्या मानानें त्या कलाकृतीची किंमत कमीअधिक ठरेल. या गुणांच्या अभावीं ती कलाकृति सुंदरहि दिसूं शकेल; पण तें सौंदर्य दिखाऊ पोकळ असण्याचा संभव आहे. क्वचित्प्रसंगीं हें सौंदर्य सापाच्या किंवा वाघाच्या किंवा कलावन्तिणीच्या सौंदर्याप्रमाणें घातुकहि होऊं शकेल. असें होऊं न देण्याचा प्रयत्न करणे अवश्य आहे. कलाकृति मोहक असावी, पण भलता मोह तिनें घालूं नये हें सर्वांगीण जीवनाच्या दृष्टीनें उचित आहे.

# मी व माझे टीकाकार

'मी व माझे टीकाकार' या संबंधानें 'ज्योत्स्ने' च्या संपादकांनीं चार शब्द लिहिण्यास सांगितलें, तेव्हां माझ्या लेखनाविषयीं व माझ्याविषयीं मी विचार करूं लागलों आणि पहिल्या प्रथम हा विचार आला कीं, सिंहावलोकन करण्याचे आपले दिवस आलेले दिसतात–आतां पुढें जाण्याचे दिवस संपत आले, मागें पाहून गत सुखदुःखांचा आढावा घेऊन तो लोकांना सांगण्याचे दिवस आले ! तथापि आयुःप्रवासाच्या मध्यभागीं देखील क्षणभर सिंहावलोकन करण्याचाहि हा काल असूं शकेल असा आशावाद स्वीकारून माझ्या टीकाकारांची आठवण करूं लागलों, तेव्हां माझ्या टीकाकारांना माझ्यांत जे गुण दिसले ते माझ्यामध्यें नाहींत आणि माझ्यांत जे दोष आहेत ते त्यांना अजिबात दिसले नाहींत, याची जाणीव उत्पन्न होऊन, मानवी टीका किती वरवरची असते हें ध्यानांत आलें व हंसूं आलें. पण अगदीं खरी, प्रामाणिक व मोकळेपणाची इत्थंभूत व कांहींएक लपवालपवी न केलेली हकिकत देण्याची वेळ अद्यापि आलेली आहे, असें वाटत नाहीं आणि ती देण्याचें धैर्य किंवा प्रामाणिकपणा माझ्यामध्यें नाहीं. लौकिक व सापेक्ष सत्याच्या दृष्टीनेंच बहुतेक लोक लिहितात व त्या दृष्टीनेंच पुढील विचार लोकांपुढें ठेवलेले आहेत.

टीका माझ्या जीवनक्रमावर व लेखनसंसारावर–अशा दोन विषयांसंबंधीं झाली व होते. पैकीं जीवनक्रमावरची टीका अत्यन्त सहानुभूतीची व उदार बुद्धीची असते. इतकी कीं मला लोक जसें समजतात तसा मी असतों तर किती चांगलें झालें असतें असें वाटतें. लोक मला पुष्कळ वेळां जो मान देतात तो पाहून माझी मलाच लाज वाटते. असो. एका गोष्टीबद्दल मात्र तक्रार करावीशी वाटते. ती अशी कीं, कोणत्याहि विषयाच्या सर्व बाजूंचा सहानुभूतीपूर्वक विचार करण्याची व असा विचार करा-

वयास लावण्याची माझी जी वृत्ति आहे तिचें महत्त्व अद्यापि पुष्कळ लोकांना कळलेलें नाहीं व या वृत्तीचा अर्थहि कित्येकांचे ध्यानांत येत नाहीं. या कर्मभूमींत 'संशयात्मा विनश्यति' हें मला ठाऊक आहे. कार्यकर्त्यांना जन्मभर बुद्धीच्या हिन्दोळ्यावर बसून अनुकूल–प्रतिकूल विचारांच्या आन्दोलनांत काल घालविणें शक्य नाहीं,–त्यांना पुष्कळ वेळां निश्चयात्मक वृत्ति स्वीकारावी लागते व त्याप्रमाणें वागावें लागतें हें मला समजतें. इतकेंच नव्हे, तर त्याचप्रमाणें मी वागतोंहि व वागण्यास सांगतोंहि. एखाद्या राजाचें किंवा मोठ्या मुत्सद्याचें रक्षण करण्याकरितां नेमलेल्या हेरांना एखादा संशयास्पद मनुष्य दिसला म्हणजे प्रथम त्याला अडवून ठेवावें, असें हेरखात्याचें जें तत्त्व आहे तें मला पूर्णपणें मान्य आहे. हेरांनीं ज्यांच्यापासून धोक्याचा संभव आहे अशा संशयास्पद लोकांना आधीं अटकेंत ठेवण्याचें काम करावयाचें आणि मग ते खरोखर संशयास्पद आहेत का नाहींत, त्यांपासून खरोखर धोका आहे का नाहीं, याची शहानिशा करावयाची, असें मी त्या खात्याचा मुख्य असल्यास त्यांना सांगेन. कारण खरें–खोटें ठरविण्यास वेळ लागतो आणि तोंपर्यंत एखाद्या वहिमी मनुष्यास मोकळेपणानें वावरूं दिल्यास एखाद वेळेस तो घात करावयाचा आणि मग त्या हेरांचा उपयोग प्रेतयात्रेपुरताच ठरावयाचा! तेव्हां ज्यावेळीं संपूर्ण, सांगोपांग, सर्व बाजूंनीं व सर्व दृष्टींनीं विचार करणें धोक्याचें असतें त्यावेळेस उपलब्ध पुराव्यावरून त्या त्या कालीं योग्य वाटणारा निर्णय तात्पुरता स्वीकारून कर्तव्यकर्म केलेंच पाहिजे असें माझें मत आहे. पण असे कांहीं प्रसंग नसतां अनिर्णित स्थितीच वाईट, सर्वांगिण विचार म्हणजे विकार, अनिश्चय म्हणजे अर्धवटपणा, अशा प्रकारची विचारसरणी स्वीकारून घाईनें निश्चय करणें हें मी वाईट समजतों.

दुसरी गोष्ट अशी कीं, कांहीं लोकांचें कर्तव्यकर्म 'विचार करण्यास शिकवावयाचें' हें असतें व कांहीं लोकांचें कर्तव्यकर्म त्यांना सम्मत अशा 'सन्मार्गाचें अवलंबन करण्यास लोकांना लावावयाचें' असें असतें; युद्धांत गुंतलेले सेनानायक, राजकीय कार्यकर्ते, पुढारी, संस्थेचे चालक व पुरस्कर्ते, चळवळे, खटपटे, अशा लहानमोठ्या लोकांचें कर्तव्यकर्म दुसऱ्या प्रकारचें असतें; कलावंत, तत्त्वजिज्ञासु, शास्त्रसंशोधक, शिक्षक वगैरे लोकांपैकीं कांहींचें तरी कर्तव्यकर्म पहिल्या प्रकारचें असतें; त्यांनीं निर्णयाबद्दल घाई करण्याचें कारण नसतें; त्यांनीं लोकांना खरें–खोटें, चांगलें–वाईट, शुद्ध–अशुद्ध, सिद्ध–असिद्ध हें खडयांप्रमाणें हातावर निवडून ठेवलें

पाहिजे असें नाहीं, तर खरें–खोटें, चांगलें–वाईट, इत्यादि कसें ठरवावयाचें हें त्यांनीं शिकवावयाचें असतें आणि खरें, चांगलें, शुद्ध, सिद्ध इत्यादि इष्ट गोष्टींबद्दल आस्था, उत्साह व भक्ति उत्पन्न करावयाची असते. मी विद्यार्थिनींमध्यें आणि वाचकांमध्यें यांत्रिक रीतीनें लाखों आयते गोळीबंद सद्विचार आणि सद्भावना उत्पन्न करूं शकलों आणि सद्विचार व सद्भावना कशा ओळखाव्यात हें सामर्थ्य त्यांच्यामध्यें आलेलें नसेल तर माझें समाधान होणार नाहीं. उलटपक्षीं, मी त्यांना एकहि निश्चित स्वरूपाचा विचार दिला नसला आणि अमुकच भावना श्रेष्ठ असा निर्णय त्यांमध्यें उत्पन्न केलेला नसला, पण त्यांच्यामध्यें मी जर सद्विचार करण्याची व ओळखण्याची, तसेंच सद्भावनांनीं प्रेरित होण्याची व त्यांची मूल्यमीमांसा करण्याची शक्ति निर्माण केलेली असली, तर मला धन्यता वाटेल !

तिसरी गोष्ट अशी कीं, कांहीं कांहीं गोष्टी अद्यापि अनिर्णित अवस्थेंत–'असिद्ध' स्थितींत–आहेत. त्यांबद्दल निर्णयात्मक मत देण्याची जरूर नसतां (किंवा तसा आपला अधिकार नसतां म्हणा पाहिजे तर) लोक आपणांला संशयात्मा म्हणतील या भीतीनें किंवा आपण मोठे शहाणे आहोंत हें दाखविण्याच्या लालसेनें, भरभक्कम पुराव्याच्या अभावीं निर्णयात्मक मत ठोकून देणें हें धाष्ट्यांचेंच केवळ नव्हे, तर तें अप्रामाणिक व पापस्वरूप आहे.

या बाबतींत चवथा मुद्दा माझ्यापुरताच सांगण्यासारखा आहे आणि तो असा कीं मी पुष्कळ वेळां माझें मत निश्चित व निर्णयात्मक स्वरूपांत दिलेलें आहे, पण तें कोणी लक्षातच घेत नाहीं ! अतिविचार हा गुण (किंवा दोष) माझ्यामध्यें इतरांपेक्षां अधिक असेल आणि एखादा गुण किंवा दोष जरा कोठें सामान्य प्रमाणाहून अधिक प्रमाणांत दिसला, कीं त्या व्यक्तीवर त्या गुणाचा किंवा दोषाचा शिक्का कायमचा बसतो. लोकांच्या या प्रवृत्तीमुळें कांहीं दोषाचा शिक्का माझ्यावर जसा कायमचा बसला आहे तसा कांहीं गुणांचाहि शिक्का बसला असल्यामुळें फिटंफिट झाली असें मीं समजतों व मनात हंसतों !

आतां माझ्या लेखनावर जी टीका झालेली आहे तिच्याकडे वळतों. प्रथम गंभीर विषयावरच्या गंभीर स्वरूपांच्या पुस्तकांकडे पाहतां 'नीतिशास्त्रप्रवेशा' वर सर्वांनीं अनुकूल टीका केलेली आहे हें ध्यानांत येतें आणि आनंद होतो. या पुस्तकावर विस्तृत टीका श्री. नानासाहेब चाफेकर यांनींच केली आहे व ती विद्वत्त्वपूर्ण आणि मार्मिक आहे. 'साक्रेटिसाचे संवाद' या पुस्तकावर कोणीच

विस्तृत टीका केली नाहीं, पण तें कांहीं विश्वविद्यालयांत अभ्यसनीय पुस्तकांत नेमलें गेलें यानें माझें समाधान झालें. ' विचार-विलास ' या पुस्तकावर विस्तृत टीका झालेली नाहीं. पण तेंहि नागपूरकडे विद्यापीठांत अभ्यासिलें जातें ही कांहीं थोडया समाधानाची गोष्ट नाहीं.

कादंबऱ्यांपैकीं ' रागिणी ' वर कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांची टीका आहे. त्याच्यासारख्या नामांकित साहित्यमर्मज्ञानें सांगोपांग टीका केल्यामुळें धन्यता वाटली. त्यांच्या टीकेंत पुष्कळच ग्राह्यांश आहे. एका गोष्टीबद्दल मला अद्यापि आश्चर्य वाटतें आणि तें हें कीं ' रागिणी ' तील भय्यासाहेबांच्या स्वभावाचें मर्म कोल्हटकरांसारख्यांच्या ध्यानात कसें आलें नाहीं. त्यांनीं भय्यासाहेबाला पत्नी-त्यागादि दोषांबद्दल खलनायकाचीच पदवी दिलेली आहे. त्यांची टीका समर्थनीयहि असेल, पण टीका यथार्थ वा अयथार्थ हा सध्यांचा प्रश्न नसून मला त्या टीकेसंबंधानें काय वाटलें हा प्रश्न असल्यामुळें हा मुद्दा येथेंच सोडतों.

रागिणीच्या मनात पापविचार स्पर्श करून गेला असें दाखविल्याबद्दलहि कांहीं ठिकाणीं टीका झाली. पण आता तशी टीका ऐकूं येत नाही ! पूर्वी समाजांतील अप्रिय सत्याकडे डोळेझाक करण्याची कांहीं लोकांची प्रवृत्ति होती ती आतां दिसत नाहीं. ( आता समाजांतील अप्रिय सत्याकडेच टक लावून पाहण्याची प्रवृत्ति वाढत आहे आणि कावळे जसे व्रणविदारण करण्यांत आनंद मानतात तसें काहीं साहित्यिक सामाजिक व्रणांचें पृथक्करण करण्यात आनंद मानीत आहेत ! )

रागिणींतील शेवटच्या खंडात काहीं रात्रींचें वर्णन करताना त्या त्या वेळीं चंद्र अमक्या ठिकाणीं होता असें वर्णन केलेलें आहे, तें चुकीचें आहे हें टीकाकारानीं दाखविलें आहे व तें सहानुभूतिपूर्वक भाषा वापरून दाखविलें आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं, माझें असल्या गोष्टींकडे फारसें लक्ष नाहीं. ' सुशीलेच्या देवा '-मध्यें मोटारी ज्या काळीं हिन्दुस्थानांत आलेल्या नव्हत्या त्या काळीं त्या आलेल्या होत्या असें वर्णन आहे तें चूक आहे. ' इन्दु काळे व सरला भोळे ' या कादंबरींतहि पत्रांच्या तारखांचे बाबतींत कांहीं चुका झाल्या आहेत, त्या एका टीकाकारानें दाखविल्या तें योग्यच झालें. आनंदाची गोष्ट ही कीं, हे दोष दाखवितांना कठोरता कोणी स्वीकारलेली नाहीं. ' आश्रमहरिणी 'त असेच कांहीं दोष आहेत ते केरळ-कोकिळकार व महाराष्ट्रभाषाचित्रमयूर कै. आठल्ये यांनीं दाखविले आहेत. पण त्यांनीं कठोर भाषा वापरली होती असें स्मरतें. याच लेखकानें ' आश्रमहरिणी '

वर टीका करतांना मी स्त्री-पुरुषांच्या स्वैर संभोगाचा पुरस्कार करीत आहें असें सुचविलें आहे ! ' आश्रमहरिणीं ' तील पवित्र वातावरण ज्याला माहीत आहे त्याला ही टीका किती अन्यायाची आहे हें सांगावयास नको. परंतु भाषाचित्र-मयूराच्या पिसाऱ्याकडेच पाहावयाचें असतें व या पिसाऱ्यांतील डोळ्यांना दिसत नसतें हें ध्यानांत ठेवावयाचें असतें !

' **आश्रमहरिणी** ' ही टेनिसनच्या ' इनॉक आर्डेन ' या काव्यावरून चोरून घेतलेली आहे असें कांहीं टीकाकार म्हणतात, हें ऐकून मला प्रथम वाईट वाटत असे; पण आतां वाटत नाहीं. एक तर ही गोष्ट थोडीशी खरी आहे; थोडीशी म्हणजे फारच थोडीशी, पण टेनिसनच्या उपरिनिर्दिष्ट काव्याचा माझ्या मनांत, वरील कादंबरी लिहितांना, विचार आला होता यांत शंका नाहीं; दुसरें असें कीं उसनवारीचा किंवा चोरीचा आरोप करणारे लोक सामान्य दर्जाचे आहेत असें मला ठाऊक आहे; अनेक रसिकांनीं आश्रमहरिणीची स्तुति केलेली आहे; इतकी कीं ती ' रागिणी ' पेक्षांहि चांगली आहे, असें पुष्कळ मार्मिकांचें म्हणणें आहे. तिसरी गोष्ट अशी कीं जगानें—म्हणजे सामान्य जगानें—उसनवारीचा आरोप करणें हें सामान्य व्यवहाराला धरूनच आहे; चोरीचा एक दागिना एखाद्या-जवळ सांपडला म्हणजे त्याच्याजवळचे इतर दागिनेहि चोरीचे असण्याचा संभव आहे असें मानणें व्यवहाराला धरून आहे ! विक्रमोर्वशीय या नाटकामध्यें वेड लागलेल्या पुरूरव्यानें उर्वशीची चालण्याची सुंदर रीत हंसानें उचललेली आहे असें पाहून हंसाला म्हटलें " हंसा, ज्या अर्थी तूं उर्वशीची गति उचलली आहेस त्या अर्थी तूं उर्वशीलाहि लपवून ठेविली असली पाहिजेस " ( हंस प्रयच्छ मे कान्तां गतिरस्यास्त्वया हृता । विभावितैकदेशेन देयं यदभियुज्यते ॥ ) सामान्य व्यवहारांत देखील समंजस बायका उसने दागिने घालीत नाहींत, कारण मग सगळेच दागिने उसने आहेत असें लोक म्हणावयाचे ! होतकरू लेखकांनीं या गोष्टी ध्यानांत धरून गौण भागांत देखील उसनवारी न करण्याची खबरदारी घ्यावी.

' संदेश, ' ' वसुंधरा, ' ' चित्रा ' वगैरे नियतकालिकांत विनोद करण्याच्या बुद्धीनें माझ्यावर जी टीका क्वचित्प्रसंगीं येते तिच्याकडे खिळाडू वृत्तीनेंच पाहा-वयाचें असतें. या टीकेंतील विनोद मला कित्येक वेळां आवडलेला आहे. पण असल्या टीकेमध्यें शास्त्रीय दृष्टीच्या धारवाडी कांट्यानें मोजलेलें सत्य पाहावयाचें नसलें, तरी एक सहस्रांश तरी सत्य असावें लागतें हें या टीकाकारांनीं ध्यानांत

धरावें असें सुचवावेंसें वाटतें. त्याचप्रमाणें ज्यांना माझ्याविषयीं कांहीं माहिती नाहीं किंवा मला काय सांगावयाचें आहे हें समजण्याची ज्यांची पात्रता नाहीं त्यांच्या 'विनोदा' ला प्रसिद्धि देतांना त्या त्या जबाबदार व्यक्तींनीं विचार केला तर बरें होईल असें म्हणावेंसें वाटतें. ( बाकी मी टीका करण्यास पात्र होण्याइतका महत्त्वाचा वाटतो ही जाणीव थोडीशी आनंददायक असते हें येथें कबूल करावेंसें वाटतें. )

एकंदरींत ही 'विनोदी' म्हणून केलेली टीका मनाला विशेष टोंचत नाहीं, कारण बरेच वेळां त्यांत क्षणभर मौज करण्यापेक्षां टीकाकाराचाहि अधिक हेतु नसतो आणि आपणहि खिळाडू वृत्तीनें त्यांतील विनोदाचा आस्वाद घेऊं शकतों; कारण त्यांत विषाचा अंश कांहींच नसतो हें आपणांस ठाऊक असतें. विष असेल तर मात्र गोष्ट निराळी. एका व्याख्यानांत मी कोणता तरी मुद्दा सांगतांना गाढवाचा दाखला दिला होता. त्या व्याख्यानाचा रिपोर्ट देतांना 'संदेश'मध्यें

**'वामनराव व गाढव'**

असा मथळा देऊन विनोद उत्पन्न करण्याचा अच्युतराव कोल्हटकरांनीं प्रयत्न केला होता. त्यावर उत्तर देण्याकरितां एक पत्र लिहावें व त्या पत्राला

**'वामनराव व गाढव'**

**वामनराव व अच्युतराव यांचा वाद**

असे मथळे द्यावेत असें प्रथम वाटलें, पण अच्युतरावांनीं पुनः माझ्यावरतीच डाव उलटवला असता या भीतीनें ( व इतर कारणांस्तव ) मी पत्र लिहिलें नाहीं !

माझ्यावरच्या टीकेंतील एक मौजेची गोष्ट सांगून हा लेख संपवितों. मडगांव [गोवें] येथें साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष म्हणून जें भाषण केलें त्यांत मुंबईतील एका साप्ताहिकासंबंधानें मी जें थोडेसें प्रतिकुल लिहिलें होतें तें वाचल्याबरोबर त्या साप्ताहिकाचा संपादक भडकला आणि त्यानें मला एक भलें मोठें लांबलचक पत्र लिहून माझ्या विधानाची सत्यता पटवून देण्याबद्दल आव्हान केलें. मौज अशी कीं, माझीं हींच विधानें ( बहुधा न वाचतांच ) त्या साप्ताहिकास अत्यन्त अनुकूल व स्तुतिपर आहेत असें पुण्यांतील एका सुप्रसिद्ध साप्ताहिकाच्या सुप्रसिद्ध संपादकास वाटून, माझ्या विधानांतील स्तुतीबद्दल तोहि भडकला आणि त्यानेंहि मला भलती स्तुति केल्याबद्दल दोष दिला! माझ्या विधानांतील भाषा संदिग्ध होती असें वाटत नाहीं; मग असें कां झालें ? कारण कांहीं का असेना, विशेष खोलांत जाऊन तें हुडकून काढण्यांत अर्थ नाहीं. हा अनुभव मात्र मला मौजेचा वाटला आणि म्हणून येथें सांगितला.

# गतगोष्टी अर्थात् माझी जीवनयात्रा

रा. न. चिं. केळकर यांच्या तोंडावरहि त्यांची निंदा करणारे जसे आहेत तसेच त्यांच्या पाठीमागेंहि त्यांची स्तुति करणारे आहेत. त्यांच्या गुणावगुणांची छाननी जो तो आपापल्यापरीनें करीतच असतो. पण श्री. केळकर स्वतः आपल्या संबंधीं काय म्हणतात हें जाणण्याचें साधन त्यांचें आत्मचरित्र प्रसिद्ध होण्यापूर्वी कांहीं नव्हतें. हें साधन आतां उपलब्ध झाल्यामुळें त्यांच्या जीवनकार्याची मूल्य-मीमांसा करण्याच्या कामीं एक मोठा आधारग्रंथ चिकित्सक मीमांसकाना लाभला आहे. त्यांच्या जीवनकार्याकडे ज्यांनीं विकृत दृष्टीनें पाहिलें ते त्यांच्या या ग्रंथाकडेहि विकृत दृष्टीनें पाहतील यांत नवल नाहीं; पण कांहीं बाबतींत तरी त्याना आतां भलती निंदा करणें कठीण पडेल. एकच लहानसें उदाहरण द्यावयाचें म्हणजे केसरी ऑफिसमधून श्री. खाडिलकर जे निघाले ते केळकरांच्या कारवाईमुळें निघाले हें यापुढें म्हणणें जरा धाष्टर्याचेंच होईल. श्री. केळकरांची भलतीच स्तुति करणारे स्तुतिपाठक फारसे नव्हतेच व नाहींतहि. तेव्हा या ग्रंथामुळें त्यांच्या चहात्यांच्या मनांत फारसा फरक व्हावयाचा नाहीं. झालाच तर तो केळकरांबद्दलचा आदर वाढविणाराच होईल.

मी या दुसऱ्या वर्गात मोडणारा आहें. अर्थात् हें पुस्तक वाचून त्यांच्याबद्दलचा माझा आदर वृद्धिंगत झाला हें उघड आहे. या पुस्तकांतील पहिलें प्रकरण 'हृद्गत' नांवाचें आहे तें, आणि शेवटलें प्रकरण ' आत्मनिरीक्षण ' नांवाचें आहे तें, हीं दोन्हीं वाङ्मयकलेच्या दृष्टीनें अत्यंत रमणीय झालेलीं आहेत. त्याचप्रमाणें ' कोकण्याची विलायत, ' ' कांहीं कौटुंबिक माहिती, ' 'लहानपणच्या आठवणी,' ' कॉलेज व विद्यापीठ ' या प्रकरणांत त्या त्या विषयाची माहिती तर आहेच; पण

असली माहिती केळकरांसारख्या रसिक आणि कसलेल्या लेखकानें दिली म्हणजे ती किती मनोरंजक व उद्बोधक होऊं शकते हें त्यांवरून दिसून येतें.

केळकरांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमाबद्दलचीं जीं प्रकरणें आहेत त्यांची वाङ्मय-कला या दृष्टीनें विशेष स्तुति करतां येईल असें मात्र म्हणवत नाहीं. केळकरांचें कोणतेंहि लिखाण घेतलें तरी वाङ्मयदृष्ट्या त्यांत सामान्य लेखकाहून अधिक गुण असावयाचेच, त्याचप्रमाणें या प्रकरणांतहि आहेतच; पण ते उत्कटत्वानें नजरेंत भरत नाहींत असें मला म्हणावयाचें आहे. हीं प्रकरणें आत्मसमर्थन या नात्यानें लिहिलेलीं दिसतात. ( न्यूमन या लेखकाच्या एका ग्रंथाचें नांव ' Apologia Pro Vita Swa ' म्हणजे ' आत्मजीवनसमर्थन ' असें आहे; तें नांव या विभागाला द्यावेंसें वाटतें. ) आत्मसमर्थन करण्यांत कांहीं गैर आहे असें नाहीं, किंबहुना दुसऱ्यानें आपली बाजू उचलून धरण्यापेक्षां आपण आपली बाजू आपल्या दृष्टीनें मांडणें हें उचितच नव्हे, तर आवश्यक आहे. एक कारण असें, कीं एखाद्याच्या मनांतले सर्व हेतु, त्याची मनःस्थिति आणि त्याच्यापुढें असलेली सर्व परिस्थिति यांची माहिती त्याच्याप्रमाणें इतरांना असणें शक्य नाहीं आणि अपूर्ण माहिती असलेल्या स्नेह्यानें आपलें समर्थन केलें तर एखादे वेळेस ' मित्रांपासून माझा बचाव करा ' ( Save me from my friends ) असें म्हणण्याची पाळी येते ! आणि अशी जरी पाळी आली नाहीं, तरी त्या समर्थनांत पूर्ण ज्ञानाच्या अभावामुळें कांहींतरी उणीवा राहणारच. तेव्हां केळकरांनीं आत्मसमर्थन लिहिलें हें उचितच केलें. पण या आत्मसमर्थनांत वाङ्मयकलेचा उत्कर्ष दिसत नाहीं. त्याचप्रमाणें तात्त्विक व व्यापक दृष्टीचाहि उत्कर्ष जेवढा दिसावा तेवढा दिसत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. केळकरांचें त्या त्या काळचें राजकीय धोरण बव्हंशीं मान्य असणाऱ्यांपैकीं मी आहें. पण या धोरणाकडे इतक्या वर्षांनंतर मागें वळून पाहतांना त्या त्या काळच्या स्वपक्षीय व परपक्षीय धोरणापाठीमागील व्यापक तात्त्विक भूमिकांची ( Ideologies ) मीमांसा करणें जरूर होतें; पण तें या ग्रंथांत विशेष दिसत नाहीं. केसरीमध्यें आणि इतर ठिकाणीं त्यांनीं आपल्या धोरणाविषयीं पुष्कळच लिहिलेलें आहे, म्हणून पुनरुक्तिभयास्तव त्यांनीं या गोष्टी टाळल्या आहेत हें त्यांनीं या पुस्तकांतच म्हटलें आहे. पण तपशिलापेक्षां तात्त्विक भूमिके-विषयींची उणीव मला भासत आहे, त्याविषयींची माझी तक्रार आहे.

आणि खरें बोलायचें म्हणजे आत्मचरित्रामध्यें तात्त्विक भूमिकेबद्दलचीहि मी फारशी अपेक्षा करीत नाहीं. आत्मचरित्रामध्यें बारीक सारीक गोष्टींनाच विशेष महत्त्व आहे. या बारीकसारीक गोष्टी इतरांना माहीत नसतात म्हणून त्या आत्मचरित्रकारांनीं द्याव्यात हें एक; आणि दुसरें अधिक समर्पक कारण असें, कीं लोकांच्या डोळ्यांसमोर चमकणाऱ्या ( लोकांच्या डोळ्यांत भरणाऱ्या किंवा खुपणाऱ्या ) मोठ्या गोष्टींपेक्षां क्षुल्लक भासणाऱ्या अप्रसिद्ध गोष्टींवरून मनुष्याचें व्यक्तिमत्त्व अधिक स्पष्टत्वानें दिसून येतें,–निदान या गोष्टींवरून त्या मनुष्याचें स्वभावचित्र केवळ बौद्धिक, भावात्मक, निराकार न राहतां त्या चित्राला मूर्त, सजीव, रूप-रस-गंधयुक्त विशिष्ट स्वरूप येतें; आणि शिवाय ही गोष्ट निश्चित कीं लोकांना थोरामोठ्यांच्या लहानसहान गोष्टी ऐकण्याची ( बऱ्याच वेळीं मनोविकृतिजन्य ) जिज्ञासा असते. विकृत जिज्ञासेची तृप्ति करण्याची जबाबदारी आत्मचरित्र-लेखकावर नाहीं हें खरें; पण स्वाभाविक व निर्दोष जिज्ञासेची तृप्ति करण्यांत कांहींएक गैर नाहीं. इतकेंच नव्हे तर आत्मचरित्र-लेखकाच्या व त्याच्याशीं संबंध असलेल्या लोकांचें स्वभाववैशिष्ट्य, त्यांतील सूक्ष्म, गुंतागुंतीच्या, विरोधाभासात्मक छटा, इतरांना न दिसणारे पैलू, इत्यादिकांचें दिग्दर्शन केल्यानें आत्मचरित्र परलिखित चरित्रापेक्षां मनोरंजक व उद्बोधक होऊन त्यातील उणीव भरून काढतें आणि अशा रीतीनें पूरक आणि पोषक ठरतें.

केळकरांचा संबंध राजकीय पुढारी, समाजसेवक, शिक्षणशास्त्रज्ञ, कायदेपंडित, शेटसावकार, साहित्यिक, नट वगैरे अनेक प्रकारच्या व थरांतल्या लोकांशीं आलेला होता. तत्संबंधीं या आत्मचरित्रात काहीं गोष्टी वाचण्यास मिळतील अशी वाचकांची अपेक्षा असते. परंतु तिचा भंग झाल्यामुळें हें आत्मचरित्र वाचून थोडेंसें असमाधान उत्पन्न होतें. केळकरांनीं आपल्याशीं संबंध आलेल्या कांहीं व्यक्तींच्या गोष्टी व कांहीं स्वभावचरित्रें लिहून ठेवलीं आहेत ( सुमारें चारशें पानांपर्यंत असा मजकूर आहे ); पण पुस्तकाचीं हजारएक पानें भरून गेल्यामुळें तो मजकूर त्यांत समाविष्ट करतां आला नाहीं हें त्यांनींच एके ठिकाणीं सांगितल्यावरून मला ठाऊक आहे. पण व्यक्तिशः माझें तरी ( आणि बहुतकरून बहुतेक सर्व वाचकांचें ) मत असें आहे कीं, त्यांनीं आपली राजकीय कैफियत स्वतंत्र पुस्तकांत छापून वरील स्वभावचित्रें वगैरे मजकूर जर या आत्मचरित्रांत समाविष्ट केला असता, तर तें

अधिक समुचित झालें असतें. त्यांनीं लिहून ठेवलेला, पण सध्यां बाजूस सारलेला, हा मजकूर वाचनीय आणि मननीयहि असणार याबद्दल मला तरी शंका नाहीं. त्यांनीं तो बाजूला ठेवला यांत स्थलाभावाप्रमाणें दुसरेहि कांहीं हेतु असतील हें मी कल्पनेनें जाणूं शकतों. तेव्हां त्यांना त्याबद्दल दोष देण्याचें अनौचित्य करण्याचें टाळून आणि माझी व वाचकांची अपेक्षा काय होती एवढेंच सांगण्याचा येथें हेतु आहे, एवढें सांगून हा मुद्दा येथेंच सोडतों.

चरित्रकार बहिर्मुख दृष्टीनें पाहत असतो आणि लिहीत असतो. तो चरित्र-नायकाच्या अंतःकरणांत शिरण्याचा प्रयत्न करतो, पण हा परचित्तप्रवेश पूर्णपणें यशस्वी होणें अशक्यप्राय आहे. आत्मचरित्रकाराला देखील आपल्या अंतःकोशांतील जाणिवेच्या कोपऱ्यांत आणि नेणिवेच्या बळदांत सुप्त असलेले किंवा दडले-दडपलेले विचार व विकार कळणें दुरापास्त असतें असें अलीकडील मानसशास्त्रज्ञ सांगतात तें अगदीं खरें आहे. पण बहिर्मुख चरित्रकारापेक्षां कांहींतरी अधिक गोष्टी अंतर्मुख आत्मचरित्रकाराला कळणें शक्य आहे. विशेषेंकरून आत्मवंचना न करून घेण्याबद्दल दक्ष असलेल्या आणि बव्हंशीं निरपेक्ष आणि संन्यस्त होऊन ताटस्थ्यानें सिंहावलोकन करूं पाहणाऱ्या केळकरांसारख्या समतोल बुद्धीच्या माणसाला थोडेंबहुत तरी तें शक्य आहे आणि तें या पुस्तकांत थोडेंसें साधलेलें दिसतें. निदान त्यांचा हा प्रयत्न प्रामाणिक आहे आणि मानसपृथक्करण व मनो-गाहन करूं पाहणाऱ्या चिकित्सकास फार युक्त आहे.

या आत्मचरित्राच्या आधारें केळकरांच्या मनांत प्रवेश करण्याचा प्रयत्न केल्यास त्यांना चीड कशाची येते, मनाला कोणत्या गोष्टी शल्याप्रमाणें बोंचतात, त्यांच्या मनाची सध्या घडण कोणत्या प्रकारची झाली आहे, वगैरे गोष्टींचा थोडासा थांगपत्ता लागूं शकतो. खाडिलकरांना केसरींतून जावें लागलें याबद्दलचें खापर त्यांच्यावर उगीचच्या उगीच फोडण्यांत येतें ही गोष्ट त्यांच्या मनाला लागलेली दिसते. शिवरामपंत परांजप्यांच्यामध्यें आदरार्ह विशेष गुण असले तरी त्यांच्या पद्धतीनें त्यांनी केलेली कुत्सित टीका ही देखील त्यांना बोचत असावी. हिंदी राजकारणाला ( त्यांच्या दृष्टीनें तरी ) रुळावर आणण्याचें श्रेय तर त्यांना कोणी देत नाहींच; उलट त्यांनीं पुरस्कारलेलें धोरण स्वीकारून त्यांनाच उलट नाहीं नाहीं त्या प्रकारें दूषण देणाऱ्यांकडे पाहूनहि त्यांना खेद

होतो. लो. टिळकांची धडाडी, त्यांचें धाडस, त्यांची अलौकिक आणि सर्वगामी बुद्धिमत्ता, इत्यादि गुण आपल्यामध्यें नाहींत हें केळकरच प्रांजलपणें कबूल करतात; पण लो. टिळकांचें धोरण बिकट परिस्थितींतहि स्वशक्त्यनुसार आपण चालू ठेवलें याची जाणीव मनांत न बाळगतां टिळकांच्या अपेक्षेनें आणि त्यांच्याशींच तुलना केली असतां आपणांमध्यें दिसून येणाऱ्या उणीवांवर भर देणाऱ्या निंदकांबद्दल त्यांच्या मनांत अनादर आहे. ' लोकशिक्षण ' मधील टिळकभक्तानें त्यांची जी सुसंस्कृत निंदा केली आहे तिला उत्तर देण्याकरितां त्यांनी बरींच पानें खर्चिलीं आहेत, यावरून ही निंदा त्यांच्या मनाला लागलेली दिसते.

त्यांच्या मनाला समाधानहि पुष्कळ गोष्टींनी झालेलें दिसतें. कोंकणांत जाऊन राहण्याची इच्छा त्यांना मधूनमधून तरी पुरवून घेता येते; प्रकृति सामान्यतः बरी असते; आर्थिक श्रीमंती जरी नसली, तरी दैन्याचे प्रसंग आलेले नाहींत व येत नाहींत. पत्नी शालाशिक्षित नसली तरी समंजस, तारतम्यज्ञ, सत्प्रवृत्त आणि मनानें सुसंस्कृत—इतकी कीं त्यांच्या यशाचें श्रेय तिच्याकडे थोडेंसें जातें हें प्रांजलपणें त्यांना कबूल करावेसें वाटतें; आपल्याकारितां जीव देणारे मित्र नसले, तरी आपला जीव घेऊं पाहणारे शत्रु नाहींत; आपण जाणून बुजून व्यर्थ परसंताप केलेला नाहीं आणि आपणाला खल-नम्रताहि स्वीकारावी लागली नाहीं, आपल्या हातून आपल्या शक्तीप्रमाणें उच्चतम दर्जाचें नसलें, तरी विविध क्षेत्रांत समाधान मानण्याइतकें वरच्या दर्जाचें यश प्राप्त झालेलें आहे; लोकप्रियतेचे हारतुरे, मानमान्यतेच्या खुर्च्या, आदरातिथ्याच्या मेजवान्या, गौरवांचीं स्तुतिसुमनें, वगैरे ज्या गोष्टी एखाद्यानें नाहीं म्हटल्या तरी त्याला प्रिय असतातच, त्या सर्व आपणांस उपलब्ध झाल्या आहेत; या सर्वांची जाणीव त्यांना असल्यामुळे त्यांना उचित असा अभिमान वाटतो; आणि कांहीं क्षणीं समाधान तर इतकें वाटतें, कीं, मरणाची हाक ऐकूं आली तर ' ओ ' म्हणण्यास आपण राजी आहोंत असें ते ग्रंथाच्या शेवटीं म्हणतात—किंबहुना त्या ' हाकेची आपण वाट पाहत आहोंत ' असे त्यांचे शब्द आहेत !

त्यांच्या अंगीं त्रिगुणातीत स्थितप्रज्ञता बाणली आहे असें मात्र नव्हे आणि ते तसें भासवीतहि नाहींत. आत्मचरित्रांतील कांहीं ठिकाणच्या भाषेवरून त्यांना अद्यापि चीड येते; उपरोधिक आणि खोचदार टीका करण्याचा मोह त्यांना अद्यापि आवरत नाहीं; वादविवादांत चार टोले देण्याची व घेण्याची खुमखुमी त्यांच्यामध्यें

अजूनहि आहे; आपला गौरव झालेला पाहून त्यांचें मन आनंदित होतें; आर्थिक दृष्ट्या आपण स्वतंत्र आहोंत आणि कोकणांत जाण्यायेण्याच्या आपल्या हौशी आपण पुरवूं शकतों याबद्दल त्यांना धन्यता वाटते असें दिसून येतें आणि मनुष्य-सुलभ हर्षशोकांपासून ते अगदीं मुक्त आहेत असें दिसत नाहीं. पण एवढें स्पष्ट दिसतें, कीं क्षुद्र कामक्रोधादिकांच्या कचाटींतून ते सुटले आहेत आणि मनुष्य-सुलभ जे मनोविकार त्यांना त्यांनीं पुष्कळच आटोक्यांत आणलें आहे. आणि सर्वांत मला आनंदाची गोष्ट वाटते ती ही कीं या संसारांतील हेवेदावे, रुसवेफुगवे, रागलोभ वगैरेंपासून ते जरी पूर्णपणें अलिप्त झालेले नसले, तरी त्यांच्या सांसारिक मनाची बैठक आतां उच्च भूमिकेवर गेलेली असून मधूनमधून ते तेथील निर्मळ वातावरणांत हिंडतफिरत निरीक्षण-मननादि व्यापार प्रसन्नतेनें करूं शकत आहेत आणि खालच्या चढउतारांकडे, खांचखळग्यांकडे, त्याच्या आसपास बागडणाऱ्या पशुपक्ष्यांकडे, शेतांत खपणाऱ्या शेतकऱ्यांकडे, बागेंत रोपांची वगैरे जोपासना करणाऱ्या माळ्यांकडे, किंबहुना टक्कर देणाऱ्या व शिंगाशिंगी करणाऱ्या बैलटोण-ग्यांकडेहि किंचित् ताटस्थ्यानें, बऱ्याच कुतूहलानें, कित्येक वेळां कौतुकानें आणि सामान्यतः निर्विकारतेनें व निःस्वार्थतेनें पाहूं शकत आहेत.

" केळकरांना स्वपक्षांत मित्र नाहीं व प्रतिपक्षांत शत्रु नाहीं " अशी एक चाटूक्ति ( Epigram ) केळकरानींच दिलेली आहे. " केळकरांना महाराष्ट्राच्या राजकारणांत पहिल्या पंक्तींत जो बसवील तो मूर्ख आणि त्यांना साहित्यकारणांत दुसरा नंबर देईल तो मूर्ख " अशी दुसरी चाटूक्ति त्यानीं दिली आहे. " केळकर चांगले आहेत म्हणून त्यांना वाईटपणा आलेला आहे " अशी तिसरी एक चाटूक्ति मी सुचवितों ! " केळकर हे समतोलपणें विचार करतात हाच त्यांचा गुण आणि हाच त्यांचा दोष " अशी आणखी एक भर घालतां येईल. या सर्वा-वरून एवढें दिसून येतें, कीं केळकरांच्या गुणांनीं त्यांना मोठपणा दिला आणि त्यांमुळेंच त्यांच्याकडे वैगुण्य आलें.

**गुणानामेव दौरात्म्याध्दुरि धुर्यो नियुज्यते ।**
**असंजातकिणस्कंधः सुखं स्वपिति गौर्गलिः ॥**

अशा रीतीनें गुणांचें दौरात्म्य पूर्वी एका सुभाषितकारानें वर्णिलें आहे. गुणांचें वर दिग्दर्शित केलेलें दौरात्म्य दुसऱ्या एखाद्या सुभाषितकारानें वर्णन करण्यासारखें आहे.

# अनिरुद्ध प्रवाह

' कृष्णाबाई ' हें टोपणनांव धारण करणाऱ्या बडोद्याच्या एका लेखिकेच्या मोत्यांप्रमाणें चमकणाऱ्या 'मानसलहरी' पाहून आणि तिच्या मार्मिकतेच्या सात्विक तेजाचा आजतागायत चाललेला ' अनिरुद्ध प्रवाह ' पाहून आधुनिक कथालेखका-मध्यें तिला ' साहित्य-मुक्ता ' म्हणून दुसरें टोपणनांव देण्यांत येईल असें वाटतें—इतके हे दोन लघुकथासंग्रह मनोहर आहेत. प्रस्तुत ' अनिरुद्ध प्रवाह ' वाचून झाल्यावर मला पुष्कळ काळ झालेला नव्हता इतका आनंद झाला आणि इंग्रजीं-तील उत्तम लघुकथालेखकांच्या खुर्चीला खुर्ची लावून बसूं शकणारे मराठींतले हातांच्या बोटांवर मोजण्याइतके जे लेखक आहेत त्यांमध्यें कालदृष्ट्यान नव्हे तर गुणदृष्ट्याहि ही कदाचित् लेखिका ' कनिष्ठिकाधिष्ठित ' होईल असें वाटूं लागलें.

कृष्णाबाईंनीं संसाराकडे डोळे उघडे ठेवून मार्मिकपणें निरीक्षण केलें आहे. त्यांनीं उपदेशकाची भूमिका घेतलेली नसली तरी त्यांना आपले अनुभव आणि विचार कलात्मक स्वरूपांत सांगावेसे वाटतात आणि त्यांची कलेसंबंधीं कल्पनाहि यथार्थ दिसते. ' वैयक्तिक सुखदुःखांवरून निघणारे सामान्य सिद्धान्त अगर व्यापक स्वरूपाचे सामाजिक प्रश्न कलात्मक स्वरूपांत मांडणें म्हणजे वाङ्मय, आपल्या सुखदुःखांच्या कथा म्हणजे वाङ्मय नव्हे ' असें त्यांच्या एका कथेंतील एक पात्र म्हणतें तें त्यांच्या मताचेंच दिग्दर्शक असावें असें प्रस्तुत लघुकथांच्या संग्रहावरून म्हणण्यास हरकत नाहीं.

या संग्रहांत एकंदर दहा लघुकथा आहेत. त्यांतील ' आई ' ही मला तंत्राच्या व इतर दृष्टीनें फारच आवडली. त्यांतील ' मुद्दा ' विशेष कांहीं गहन नाहीं. कवि यशवंत यांची ' आई ' ही सुप्रसिद्ध कविता पूर्ववयांत ऐकल्यावर एका युवतीला आपल्या दिवंगत आईची आठवण झाली आणि तिनेंच बारातेरा वर्षांनंतर यश-वंतरावांची तीच कविता ऐकल्यावर तिच्या डोळ्यांतून अश्रू आले. पण आईची

आठवण होऊन नव्हे, तर ' आई ' होऊन चिमण्या मुलांमुलींचें वात्सल्यपूर्वक कौतुक करण्याचें भाग्य आपणांस नाहीं म्हणून ! कल्पना साधीच आहे; पण तिची मांडणी ' तंत्र 'दृष्ट्या व ' मंत्र 'दृष्ट्या अत्यंत हृदयस्पर्शी आहे. स्त्रीहृदयामध्यें विशिष्ट वयांत वात्सल्याची भावना तीव्र असते आणि या भावनेचें समाधान या नाहीं तर त्या रीतीनें करून घेण्याचा प्रयत्न स्त्रिया करीत असतात. या कल्पनेवर प्रस्तुत संग्रहांत ' लढाईचा शेवट ' नांवाची एक गोष्ट आहे; पण ती इतकी परिणामकारक होत नाहीं. याचें कारण असें, कीं नायिकेच्या कृति, तिचें वागणें-सवरणें, तिचें बोलणें-चालणें यांवरून वरील मुद्दा प्रत्ययाला विशेष न येतां दुसऱ्या एका बाईनें तिच्या स्वभावाचें पृथक्करण केलेलें त्यांत आपणांस वाचावयास मिळतें.

' कळ्यांचे निश्वास कीं सुवास ' या गोष्टींत सुप्रसिद्ध विभावरी शिरूरकर यांच्या ' कळ्यांचे निश्वास ' या पुस्तकासंबंधीं निरनिराळ्या लोकांचें मत दिग्दर्शित करून त्या पुस्तकाच्या वाचनानें एका तरुणाच्या आयुष्यांत एक सुंदर घटना कशी घडून आली हें दाखविलें आहे. या गोष्टीचें निमित्त करून ' कळ्यांचे निःश्वास ' यावर लेखिकेनें टीका केली आहे असें कांहीं लोकांचें मत आहे तें मला पसंत नाहीं. विभावरी शिरूरकरांचें हें पुस्तक वाचून कथानायक जो श्रीनिवास त्याला कळून आलें कीं आधुनिक स्त्रियाना शिक्षण मिळाल्यामुळें त्यांच्यांत बंडखोर प्रवृत्ति निर्माण झाल्या असल्या तरी त्यांच्या मूलभूत स्त्रीसुलभ भावना त्याच आहेत. फक्त त्यांच्या प्रकटीकरणाचे मार्ग बदललेले आहेत. हें कळून आल्यामुळें त्याचें ज्या एका मुलीवर प्रेम बसलेलें असतें आणि जी आपणांस स्वीकारील किंवा नाहीं अशी त्याला भीति वाटत असते—किंबहुना जिच्याजवळ जाण्यास तो भीत असतो—तिच्याकडे जाण्याचा धीर वरील पुस्तकामुळें त्याच्यामध्यें उत्पन्न होतो. गोष्ट चांगली आहे; पण नायक-नायिकांचा परिचय होतो, उभयतांमध्यें प्रेमाच्या उदय होण्याचीं चिन्हें होतीं, पण नायकाला भीति वाटत असल्यामुळें तो उगीच दूरदूर राहतो आणि ' कळ्यांचे निःश्वास ' वाचल्यामुळें तो धीर करून विवाहयाचना करतो असें दाखविलें असतें तर तें अधिक प्रत्ययकारक झालें असतें. आहे त्या स्थितींत गोष्टीचा शेवट आनंदात्मकच कां व्हावा याला कारण नाहीं आणि ' कळ्यांचे निःश्वास ' वाचून इतका परिणाम श्रीनिवासच्या मनावर जो झालेला दाखविला आहे तोहि कलादृष्ट्या विश्वासार्ह वाटत नाहीं.

' पुण्यात्मे ' या गोष्टींत, समाजांतील वाईट चालीरीतींबद्दल शाब्दिक निषेध

करणारे लोक पुष्कळ असतात, पण बहुतेक लोक स्वतःवर पाळी आली म्हणजे जुन्या समजुतींनाच चिकटून राहातात हें अनुभवाला आल्यामुळें एका बाईला सभांमध्यें वगैरे निषेध करणाऱ्यांची अखेर कशी चीड येऊं लागते हें दाखविलें आहे. पण दोष दाखवायचाच म्हणजे मात्र असें म्हणतां येईल, कीं विशिष्ट स्त्रीशीं विवाह करण्यास प्रेम, अनुरूपता इत्यादि इतर सर्व गोष्टी अनुकूल असून केवळ समाजाच्या भीतीमुळें किंवा रूढिप्रियतेमुळें एखादा मनुष्य विशिष्ट विवाह करण्यास तयार झाला नाहीं तरच ती चीड आणण्यासारखी ठरेल, एरवीं नाहीं. एखाद्यानें एखाद्या रूढीचा निषेध केला म्हणजे त्यानें प्रेमादिकाभावीं देखील विशिष्ट स्त्रीशीं लग्न केलें पाहिजे आणि आपला निषेध कोठल्याहि परिस्थितींत कृतींत आणलाच पाहिजे असें शास्त्र नाहीं. या दृष्टीनें पाहातां एका परित्यक्ता स्त्रीशीं विवाह करण्यास तयार न होणाऱ्या लोकांची परिस्थिति त्या विवाहास योग्य अशीच होती हें अधिक परिणामकारक रीतीनें दाखविणें जरूर होतें.

‘ शास्त्रज्ञाचा शोध ’ या गोष्टींत ‘ प्रेमा ’ चें लक्षण व त्याचा अर्थ यांबद्दल अनेक विद्वानांचीं मतें देऊन प्रेम हें कोठल्याहि कोशांत दिलेल्या विवरणावरून किंवा कोठल्याहि शास्त्रीय उपपत्तीवरून किंवा कोणाशींहि वादविवाद करून कळत नाहीं, तर अनुभवानेंच तें कळतें हें चांगलें दाखविलें आहे. प्रेम काय आहे, तें केव्हां व कसें उत्पन्न होतें, हें सांगून कसें कळणार ? याचें विवरण करतांना कृष्णाबाई म्हणतात “ क्षितिजावर सूर्य केव्हां येतो तें नक्की कळतें पण पहाटेच्या अंधुक अंधाराचें बाराच्या तेजाळ प्रकाशांत कसकसें रूपांतर होतें तें कळत नाहीं. पहाटे आपण चाचपडतों, थोडया वेळानें म्हणतों, ‘ किती लख्ख प्रकाश पडला आहे ! ’ पण तो कुठून येतो, कसा येतो, अणुरेणूंना कसा व्यापतो तें कळतें का ? ”

‘ संरक्षक ’ ही गोष्ट मानसशास्त्रदृष्ट्या फारच बहारीची आहे. त्रिवेणी आणि विनायक यांचें लहानपणापासून अत्यंत प्रेम; पण दैवदुर्विलासानें तिचा दुसऱ्याशीं विवाह झाला. त्रिवेणी ज्या शहरांत राहते त्या ठिकाणीं हिंदु-मुसलमानांचा दंगा कांहीं दिवस चालू असतो आणि विनायक तिच्या संरक्षणाकरितां धावून जातो. पण विनायकाशीं एकान्त-प्रसंग आला असतां आपण मोहवश होवूं अशी त्या भावनाप्रधान युवतीला भीति वाटते आणि ती विनायकाला म्हणते, “ विनायक, अगदीं खरं सांगूं तुला, मला परदेशांत भीति नाहीं. दंग्यांत भीति नाहीं. उभ्या जगांत मला एकाच व्यक्तीपासून धोका आहे. त्या व्यक्तीपासून माझं रक्षण तूं करशील ? ”

" कुणापासून ? कुणापासून, सांग ? " विनायकानें अधीरपणें विचारलें.

" विनायक, " ती म्हणाली, " तुला वाटतं, माझ्या सौंदर्यामुळें मला जगाकडून धास्ती आहे. तुला असं कळत नाहीं, कीं जगांत दुसऱ्या कोणी अतिप्रसंग केला तर त्याची भीति नाहीं; कारण त्या वेळीं माझा मेंदू जागा असतो. पण तुझ्या स्पर्शात माझ्या शारीरिक आणि मानसिक विरोधी शक्तींचा लोप करण्याचें सामर्थ्य आहे. तुझ्या सान्निध्यांत असतांना हजारो वर्षांच्या संस्कृतीचे पाश खिळखिळे होतात, पातिव्रत्याची कदर वाटत नाहीं... आता सांग, विनू, जगापासून माझं संरक्षण तूं करशील; पण तुझ्यापासून—नव्हे, माझ्यापासून, माझं संरक्षण करणं तुला शक्य आहे का ? "

हें शेवटलें वाक्य आणि त्यांतल्या त्यांत ' तुझ्यापासून—नव्हे, माझ्यापासून ' या शब्दांतील मार्मिकपणा शब्दानें कसा वर्णन करावयाचा ? गोष्ट संपविण्याकरितां वरील वाक्य लिहिल्यानंतर कृष्णाबाईनीं देखील पुढें कांही लिहावयास नको होतें. गोष्टींतील पुढील परिच्छेद गाळला तर कलादृष्ट्या विशेष कांही हानि झाली नसती. 'शिकारी' नांवाच्या शेवटच्या गोष्टींत 'विचारं जोडपं' हे दोनच उद्‌गारात्मक शब्द अखेरीस आहेत; पण या द्विशब्दात्मक उद्‌गारांनी जें काम झालें आहे तें आणखी एखादा परिच्छेद लिहूनहि झालें नसतें. कृष्णाबाईमध्यें उत्तम कलावन्तांत सापडणारा असा संयम आहे म्हणूनच शेवटला तो परिच्छेद घालण्यांत चूक आहे असें म्हणावेंसें वाटतें. उगाचच्या उगाच गोष्ट लांबविणाऱ्यांचे दोष दाखविण्यांत अर्थ काय ?

हा अभिप्राय लिहिण्यामध्यें मीहि संयम पाळला पाहिजे; कारण तो योजिल्यापेक्षां आधींच लांबला आहे. अध्यापन व अभिप्रायलेखन हा अर्धवट धंदाच ज्याचा झाला आहे त्याला मुलांचे व लेखकांचे दोष काढल्याशिवाय, मला वाटतें, चैनच पडत नाहीं. म्हणून मला ' अनिरुद्ध प्रवाह ' हें पुस्तक फार आवडलें असलें तरी कांहीं दोष मी दाखविले. एरवीं खरें पाहिलें तर हें पुस्तक वाचून झाल्यावर अगदीं पहिल्याप्रथम म्हटल्याप्रमाणें मला सहसा न मिळणारा असा आनंद झाला होता. कथानक, रचनातंत्र, वगैरेंमध्यें तें जसें सुंदर आहे तसेंच भाषेच्या बाबतींतहि आहे. प्रस्तुत ' अनिरुद्ध प्रवाहां'तील भाषेचा प्रवाह अनिरुद्ध आहे; तींत कृत्रिमता नाहीं; इष्ट संस्काराला बाधक होईल अशी उपमादिकांची रेलचेल नाहीं; पण योग्य ठिकाणीं माफक अलंकार आहेत.

---